


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका

# दीपावली

क्रिकेट शौकिनांसाठी
खास पुरवणी

डिसेंबर १९६९
वर्ष २५ वें
मूल्य १॥ रु.

अनुक्रमणिका

रजतमहोत्सवी वर्ष
डिसेंबर १९६९
मूल्य १॥ रुपया



# दीपावली

खास वार्षिक क्रिकेट पुरवणी

● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ●

## श्रे य ना मा व ली

● स्त्री आणि राजकारण (उत्तरार्ध) . सहज कशा खेळविती **दादूमिया** ● पत्रभूषण अर्जुनराव गादीगिर्दीकर . जनता इकडे लक्ष देईल काय? **प्रा. उत्तम शिरवळकर** ● लोहगड ते लंडन फिनलंडमधील फेरफटका **ह. सी. उर्सेकर** ● काका कुबेर देता किती घेशील ? **तु. मो. साळी** ● ठोकर . पळा पळा कोण पुढे पळे तो . **प्रकाशचंद्र देशपांडे**

**खास क्रिकेटची पुरवणी :** भारतीय क्रिकेटची दुर्दशा : **अरविंद लवकरे** ● क्रिकेटची सव्वाशे वर्षे : **कमलाकर परांजपे** ● मला आवडलेले क्रिकेट समीक्षक : **अरविंद ताटके** ● क्रिकेटपटूंच्या मुलाखती : **प्रा. अविनाश केळकर**

शिवाय ● दीपमाला ● ऐसी अक्षरे रसिके ● सन्मानपुष्पे ● आमचेही (एक) मत ● रंगमंच इत्यादि नेहमीची सदरे आणि

**✻ 'इंडी-सिंडीकेट' कसोटी सामना ✻**

**मासिक व्यंगचित्रमाला**


टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**



संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किमत १॥ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio 42, Kennedy Bridge, Bombay–4.





अनुक्रमणिका





**दलाल आर्ट स्टुडिओ**
४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४
टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :
३५७७६५ DALALART


● **वर्गणीदारांस सूचना** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५ द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी रु. ३० परदेशी वार्षिक वर्गणी रु. २०

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छे-नुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणी-मुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.
● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्था-पकावर नाही.


**संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. दीनानाथ दलाल यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.**




# दिवाळी अंकानंतर....

'दीपावली'चा यंदाचा दिवाळी अंक हा पंचविसावा अंक असल्याने तो 'रजतमहोत्सवी विशेषांक' म्हणून विशेष स्वरूपात प्रसिद्ध करण्याची आमची मनीषा पूर्ण झाली याची पावती आमच्याकडे वाचकांकडून आलेल्या अनेक पत्रांवरून मिळाली. दिवाळी अंकाचे साहित्यिकांनी आणि आमच्या असंख्य वाचकांनी केलेले उत्स्फूर्त स्वागत पाहून आम्हांला धन्यता तर वाटलीच, पण आपल्या परिश्रमांचे चीज झाल्याचा एक आगळाच आनंद असतो, तो आम्हांस अनुभवायला मिळाला. अर्थात या यशामध्ये दिवाळी अंकातील आमचे लेखक आणि कविमित्र यांचा वाटा फार मोठा आहे याची आम्हांला जाणीव आहेच. तसेच या यशाला वाचकांनीही अंकाचे स्वागत करून हातभार लावला आहे याबद्दल आम्ही त्या सर्वांना धन्यवाद देत आहोत.

'दीपावली'च्या वाटचालीतील पंचवीस वर्षांच्या टप्प्यावर आज आम्ही उभे आहोत. यावेळी वाचकांनी दिवाळी अंकाच्या केलेल्या स्वागताने आमचा उत्साह दुणावला आहे आणि वाचकांची अधिकाधिक सेवा करण्याचा नवा हुरूप आम्हांला प्राप्त झाला आहे. आमच्या या वाटचालीत ज्या ज्या साहित्यिक मित्रांनी आम्हांला साथ दिली त्या सर्वांबद्दलची कृतज्ञता आम्ही दिवाळी अंकात व्यक्त केलेली आहेच. तथापि, दिवाळी विशेषांकाच्या कामाच्या गड-बडीत आमचे एक नजिकचे मित्रवर्य प्रा. मं. वि. राजाध्यक्ष यांच्या नावाचा उल्लेख नजर-चुकीने राहून गेला याची आम्हांला खंत वाटते. 'दीपावली'ने निरनिराळ्या प्रचलित विषयां-वरील परिसंवाद प्रसिद्ध करण्याचा उपक्रम केला आणि तो पुढे लोकप्रियही झाला. त्यातील यशाचा फार मोठा वाटा प्रा. राजाध्यक्ष यांचाच आहे. परिसंवाद प्रसिद्ध करण्याची मूळ कल्पना त्यांचीच. त्या कल्पनेनुसार निरनिराळे विषय निवडून त्या विषयावरील जाणकार व्यक्तींचे विचार संकलित करण्याच्या कामी त्यांनी अतोनात परिश्रम घेतले. त्यांच्याबद्दलची कृतज्ञता येथे व्यक्त करून आम्ही झालेल्या प्रमादाचे परिमार्जन करीत आहो.

'दीपावली'चा वर्षारंभ मार्च महिन्याच्या अंकापासून होत असला तरी नवनवीन स्वरूपाचे साहित्य देण्याचा प्रारंभ आम्ही जानेवारीपासूनच करीत आहो. दिवाळी अंकातील दोन कादं-बरिका आणि इतर काही साहित्य यांचा मजकूर अनपेक्षितपणे वाढल्यामुळे 'प्रस्थापित विरुध्द संतप्त तरुण' यांच्याबाबतचा परिसंवाद जागेच्या अभावी आम्हांला बाजूला ठेवावा लागला. सदर परिसंवाद जानेवारी अंकापासून सुरू करीत आहो. राजकारणाप्रमाणेच जीवनाच्या इतर क्षेत्रातूनही सध्या चालू असलेल्या खळबळजनक वातावरणाची कारणमीमांसा शोधण्या-साठी या परिसंवादातील विचारांचा बराच उपयोग होईल याबद्दल आम्हांला खात्री वाटते.

'दीपावली'चा डिसेंबर अंक आणि क्रिकेटची खास पुरवणी असे एक कायमचे समी-करणच झालेले आहे. कलेइतकेच क्रीडेलाही महत्त्व आणि लोकप्रियता आहे हे आता नव्याने सिद्ध करण्याची आवश्यकता राहिलेली नाही. न्यूझीलण्डचा क्रिकेट संघ भारताच्या दौऱ्यावर नुकताच येऊन गेला आणि ऑस्ट्रेलियाचा क्रिकेट संघ सध्या भारतात आहे. त्यामुळे भारतातील सारेच वातावरण क्रिकेटमय होऊन गेलेले आहे. अशा या चैतन्यमय वातावरणात 'दीपावली'च्या प्रथेप्रमाणे या अंकात संग्रहित केलेले क्रिकेटविषयक साहित्य आमच्या क्रीडाप्रेमी वाचकांना निश्चितच आवडेल.

**–संपादक**







अनुक्रमणिका




## हे देखील 'ग्रेट'च!

स. न. वि. वि.

जुलै १९६९ च्या 'दीपावलीत' "कान्ता वरयते वित्तम्" ही डॉ. श्यामसुंदर रघुवंशी (D. Lit.) यांची कथा प्रसिद्ध झालेली आहे. **योगायोग** (!) म्हणजे "सुगंध" ह्या दीपावली वार्षिकातही **वसंत सवनीस** ह्या लेखकाने **तीच कथा** पात्रांची नावे बदलून व ग्रामीण भाषेचा साज चढवून आपल्या नावावर बेमालूम खपविली आहे! प्रस्तुत कथेचे नाव आहे "फुकटचा" (सुगंध, पृ. ५४). चोरीचा माल नव्या स्वरूपात देण्याची ही हातचलाखी वसंत सवनीस यांस भूषणावह नाही. ग्रेट लेखकांनी असे करावे म्हणजे ग्रटच वाटते!

**डेक्कन जिमखाना,** आपला
**पुणे–४.** **–वा. भा. जोशी**

## अधिक संशोधन व्हावे!

स. न. वि. वि.

दिवाळी अंक वाचून संपवला. वास्तविक यापूर्वीच तो वाचून पूर्ण झाला असता, पण घरातील सर्वांच्याच त्यावर उडया असल्याने बराच वेळ थांबावे लागे. अंकातील कथा-कादंबऱ्या तर आवडल्याच, पण श्री. माधवराव राजवाडे यांचा 'नरकासूर–आसूर की आर्य' या लेखातील माहिती अपूर्व वाटली. श्री. राजवाडे आपल्या प्रवासात अशा काही गोष्टी टिपतात आणि वाचकांपुढे ठेवतात हे त्यांना खास भूषणावह आहे. त्यांनी वर्णिलेल्या माहितीचे अधिक संशोधन झाले पाहिजे. अशी उत्तम माहिती पुरविल्याबद्दल त्यांना धन्यवाद कळवा!

कथांमध्ये 'लेणं' (श्री. सुरेश वेंगुर्लेकर) आणि लावण्यांमध्ये कविवर्य वा. भ. बोरकरांची 'आम्ही देखिली' ही लावणी अतिशय आवडली.

**—वसंत कृ. शाळीग्राम**
**दादर, मुंबई**

## डौलदार शृंगारनायिका

स. न. वि. वि.

दिवाळी अंकाची वाटच पाहात होतो! हाती येताच प्रथम सर्व चित्रे पाहिली. चित्रकलेत मी तज्ज्ञ नाही, पण मुखपृष्ठावरील मोहक चित्रानेच आतील चित्रे प्रथम पाहण्याची ओढ लागली. मराठी शाहिरांच्या काव्यसृष्टीतील नायिका तुम्ही वाचकांपुढे डौलदारपणे उभ्या केल्या आहेत. नंतर व्यंगचित्रांकडे वळलो. प्रचलित राजकारणाचे विदारक दर्शन घडविणारी ही चित्रे फारच बोलकी वाटली.

आधुनिक कवींच्या लावण्या हा एक नवाच प्रकार आढळला. कुसुमाग्रजसुद्धा किती सुरेख लावणी लिहू शकतात! मंगेश पाडगांवकरांची 'कुंपणाय स्वस्ति' ही कविताही कुंपणावर बसणाऱ्यांना कुंपणाप्रमाणेच बोचल्याशिवाय राहणार नाही.

कादंबऱ्या अजून वाचल्या नाहीत. कथांमध्ये वेंगुर्लेकरांचं 'लेणं' दर्जेदार वाटलं. प्रभाकर पेंढारकर यांचा 'सरदार'ही मनावर छाप ठेवून जातो. स्पर्धेतल्या विनोदी कथाही छान वाटल्या. विशेषत: 'सुखी माणसाचा सदरा'मधील माधव अत्रे यांचा उपरोध उच्च दर्जाचा वाटला.

उत्कृष्ट अंक दिल्याबद्दल धन्यवाद!

**— मृणालिनी हस्तेकर**

## प्रौढ प्रणयवीरांचा मेळावा

स. न. वि. वि.

दिवाळी अंक वाचून संपवला. प्रतिवर्षापेक्षाही यंदाचा अंक अप्रतिम वाटला. साक्षेपाने विविध साहित्यप्रकार आपण या अंकात समाविष्ट केले आहेत.

श्री. जयवंत दळवी यांची कादंबरी खूप आवडली. श्री. राजाराम हुमणे यांचा 'स्वगत'चा टोला अनेक बहुप्रसव साहित्यिकांना विचार करण्यास लावील अशी आशा वाटते.

आपल्या यंदाच्या अंकातला एक विशेष म्हणजे दोन्ही कादंबऱ्या आणि बहुसंख्य कथा यामधून प्रौढ प्रणयवीरांच्या प्रेमाचा धागा गुंफलेला आढळतो. हे सहज घडले आहे की योजनापूर्वक घडवून आणले आहे हे आपणच सांगू शकाल.

**रामदास पेठ,**
अकोला. **–श्रीकांत पटवेकर**





अनुक्रमणिका

# बापू नाडकर्णी
# रमाकांत देसाई
# माधव मंत्री
# मनोहर हर्डीकर

## या क्रिकेटवीरांनी चालू क्रिकेटचे केलेले विच्छेदन

[ ऑस्ट्रेलियाच्या क्रिकेट संघाचा भारतातील दौरा सुरू होण्यापूर्वीच ऑस्ट्रेलियाचा माजी कर्णधार बॉबी सिम्पसन याने भारतीय क्रिकेट पंचांवर वृत्तपत्रातून जाहीर टीकास्त्र सोडले. त्याच्या मते भारतीय पंच हे आपल्या कामात पुरेसे निष्णात् नसतात. त्यांच्या हातून चुका होतात व त्याचे परिणाम उभय संघांना भोगावे लागतात. सध्याचा कर्णधार बिल लॉरी याने याबाबत सावध राहावे. भारतात आल्यावर बिल लॉरी याला भारतीय क्रीडा वार्ताहरांनी या संबंधी प्रश्न विचारला. त्यावर लॉरीने कसोटी क्रिकेटपटू निवृत्त होऊन वृत्तपत्रातून लिहू लागले की अशाच प्रकारची सनसनाटी विधाने करतात. सिम्पसनने व्यक्त केलेली मते या दृष्टिकोनातून पहावी असे आपले मत दिले; परंतु मुंबईच्या पहिल्याच कसोटी सामन्यात पंच श्री. शंभू पान यांनी भारतीय क्रिकेटपटू व्यंकट राघवन याला झेलचीत दिले. हा निर्णय संशयास्पद होता असा उल्लेख आकाशवाणीचे क्रिकेट समालोचक श्री. देवराज पुरी यांनी आपल्या समालोचनात केला. यामुळे ब्रेबॉर्न स्टेडियमवर जमलेल्या सुमारे पन्नास हजार प्रेक्षकांनी आरडाओरड सुरू केली. दंगलही झाली. प्रेक्षकांनी "व्यंकट राघवनला परत बोलवा" अशी एकमुखी मागणी केली. सामानाची नासधूस झाली. यामुळे सिम्पसन याने केलेल्या विधानाला मदत झाली. या संदर्भात ऑस्ट्रेलियाचा माजी कर्णधार रिची बेनॉ यानेही अशी दंगल पुन्हा उद्भवल्यास ऑस्ट्रेलियाने आपला भारतातील दौरा अर्धवट सोडून परत यावे अशी जाहीर सूचना केली. वस्तुतः असे प्रकार पूर्वी वेस्ट इंडीज आणि पाकिस्तान या देशात घडले होते. त्या वेळी दौरे अर्धवट सोडून परत यावे अशा प्रकारच्या सूचना कोणी केल्याचे स्मरत नाही. या संदर्भात आपल्या क्रिकेटपटूंच्या प्रतिक्रिया काय आहेत हे समजून घेण्यासाठी (१) श्री. माधव मंत्री (२) श्री. रमाकांत देसाई (३) श्री. बापू नाडकर्णी आणि (४) श्री. मनोहर हर्डीकर यांच्या मुलाखती घेण्यात आल्या. त्यांना विचारलेल्या प्रश्नांची रूपरेखा स्थूलमानाने खालीलप्रमाणे होती :

(१) भारतातील क्रिकेट पंच हे इतर देशातील पंचांशी तुलना करता सिम्पसन म्हणतो त्याप्रमाणे खरोखरच निष्णात् नाहीत का? अशा प्रकारचे संशयास्पद निर्णय भारताच्या परदेशच्या दौऱ्यात घडलेले होते का? तसे असल्यास तेथील प्रेक्षकांची प्रतिक्रिया कोणती होती? (२) भारतात कसोटी सामन्याच्या वेळी ज्या दंगली घडल्या त्याची जबाबदारी कोणावर? प्रेक्षकांवर की सामने भरविणाऱ्या कारभार यंत्रणेवर? (३) सध्याच्या भारतीय संघातील उणीवा कोणत्या? भारतीय निवड समितीने अलिकडे अनुभवी क्रिकेटपटूंना डावलून ताज्या दमाच्या होतकरू खेळाडूंना संधी देण्याचे धोरण स्वीकारले आहे. यातून भारतीय क्रिकेटच्या दृष्टीने काही दूरगामी परिणाम होण्याचा संभव दिसतो का? या सर्व मुलाखती प्रा. **अविनाश केळकर** यांनी खास "दीपावली"साठी घेतल्या आहेत. ]



# भारतीय पंचांबद्दल खोडसाळ प्रचार-

—बापू नाडकर्णी

"आज अनेक वर्षे भारतीय पंचांच्या निर्णयाबद्दल परदेशी क्रीडा समीक्षक आणि क्रिकेटपटू खोडसाळ टीका करून अपप्रचार करीत आहेत. परंतु मी स्वतःच्या अनुभवावरून निर्भीडपणे सांगतो की वेस्ट इंडीज आणि न्यूझीलंड येथील पंचांपेक्षा आमचे भारतीय पंच मुळीच कमी प्रतीचे नाहीत. उलट ते त्यांच्यापेक्षा सर्वच बाबतीत निष्णात आहेत. पाकिस्तानचा मला अनुभव नाही. शिवाय, सर्वच पंचांच्या हातून नकळत चुका होतात. मनुष्यस्वभावाला ते धरून आहे. शिवाय आपण असेही लक्षात घ्यायला हवे की आमच्या पंचांच्या हातून जरी समजा चुका झाल्या तरी त्याचा फायदा प्रत्येक खेपेस परदेशी संघानाच मिळालेला आहे. मग असे असूनही केवळ भारतीय पंचांविरुद्धच हा सतत अपप्रचार कां ?" असे निर्भीड विचार महाराष्ट्र व मुंबई संघाचे माजी कप्तान आणि गतवर्षी निवृत्त झालेले भारताचे अष्टपैलू कसोटी क्रिकेटपटू श्री. **बापू नाडकर्णी** यांनी मांडले.

"मग हा अपप्रचार थांबवायचा कसा?"

"त्याला आमच्या क्रिकेट बोर्डाने अधिकृत उत्तर दिले पाहिजे. यात आमच्या पंचांबद्दल तर अपप्रचार होतोच; पण आपल्या राष्ट्राचीही मानहानी नाही का ? शिवाय वेस्ट इंडीज, न्यूझीलंड, पाकिस्तान इथे अशा घटना घडतात. त्यावेळी हेच तथाकथित क्रीडासमीक्षक डोळ्यावर कातडे ओढून गप्प कां बसतात ?"

"व्यंकटराघवन प्रकरणासारखे प्रकार पूर्वी घडलेले आठवतात का ? "

"खुद्द ऑस्ट्रेलियातीलच सांगतो. या दोन्ही प्रकरणांबद्दल वृत्तपत्रातून त्यावेळी वादंग माजले होते. पहिला प्रकार इंग्लंडचा संघ वॉली हॅमंडच्या नेतृत्वाखाली ऑस्ट्रेलियात (१९४६) गेला त्या वेळचा. सर डोनाल्ड ब्रॅडमनचा झेल आयकिनने घेतला त्यावेळी तेथील पंचांनी ब्रॅडमनना नाबाद ठरविले. दुसरा प्रसंग अलिकडचा आहे. फ्रँक वॉरेलच्या नेतृत्वाखाली वेस्ट इंडीजचा संघ ऑस्ट्रेलियात गला त्या वेळचा. एका कसोटी सामन्यात मकाय आणि क्लाइन ही शेवटची जोडी खेळत होती. क्लाइनचा झेल पकडला असूनही त्याला नाबाद देण्यात आले. सामना अनिर्णित राहिला. आता सांगा ऑस्ट्रेलियाचे पंच चुका करीत नाहीत ?"

**दंगलीची जबाबदारी कारभार यंत्रणेवरच !**

"परवा ब्रेबॉर्न स्टेडियमवर जी प्रेक्षकांची दंगल झाली त्याबद्दल आपले विचार सांगाल काय ?"

"या प्रकरणात मुख्य दोषी व्यंकटराघवनच. पंचाचा निर्णय कसाही असो, खेळाडूने तो खिलाडू वृत्तीने मानलाच पाहिजे आणि कोणताही संशय व्यक्त न करता तात्काळ तंबूत परत गेलेच पाहिजे. त्याने तसे केले असते तर देवराज पुरीना आपली मते मांडायला संधीच मिळाली नसती."

"पण प्रेक्षकांची जी दंगल झाली त्याची जबाबदारी कोणावर ?"

"सामन्याची व्यवस्था पाहाणाऱ्या कारभार यंत्रणेवर, कारण एक तर प्रेक्षक बाजवीपेक्षा जास्त दराने तिकिटे खरेदी करतो. साध्या सुखसोयी तर सोडाच पण खाण्यापिण्याचे पदार्थही बाजवीपेक्षा भरमसाट दराने विकले जावेत ? जी जागा पाच हजार प्रेक्षकांनाच पुरेशी आहे त्या मर्यादित जागेत दुप्पट प्रेक्षकांना कोंबण्यात येते. प्रेक्षक वर्ग तेथे सहासहा तास ठाण मांडून बसतो. कारण जागा सोडून बाहेर गेले तर पुन्हा ती जागा मिळत नाही. मग कंटाळलेल्या प्रेक्षकांनी जर दंगल केली तर त्याचे खापर पुन्हा प्रेक्षकांवरच फोडावे काय?"

"सध्याच्या निवड समितीच्या धोरणासंबंधी तुमचे मत काय आहे ?"

"जो खेळाडू प्रकृतीने चांगला असेल, पाच दिवसाचा कसोटी सामना खेळण्याइतकी कार्यक्षमता त्याच्याजवळ असेल मग तो कितीही वयाचा (म्हणजे तरुण) असो, त्याला संधी मिळाली पाहिजे. त्यासाठी वयोमर्यादा असूच नये."

"भारतात आज गुगली गोलंदाज कां नाहीत ?"



**फसलेला चेंडू**





अनुक्रमणिका



# परदेशी पंचही चुका करतात...

—रमाकांत देसाई

"भारतात कसोटी सामन्याच्या वेळी प्रेक्षकांची भाऊ गर्दी जमते. प्रत्येक कसोटी सामन्यात, मग तो सामना ऑस्ट्रेलियाशी असो किंवा न्यूझीलंडशी असो, प्रेक्षकांची संख्या सामान्यतः पंचवीस हजार ते पन्नास हजारापर्यंत असते. यांतील बहुसंख्य लोकांना क्रिकेट कळते असेही नाही. पाकिस्तान सोडले तर असा प्रेक्षक वर्ग परदेशात निदान भारतीय संघाशी होणाऱ्या सामन्याच्या वेळी तर मुळीच नव्हता. त्यामुळे अशा दंगली उद्‌भवण्याचा प्रश्नच नव्हता. आपल्याकडे जागा कमी तर प्रेक्षक भरमसाट, खच्चून भरलेले असतात. त्यातून ह्या दंगली होतात आणि अशा दंगली पूर्वी वेस्ट इंडीजमध्ये झालेल्या होत्या. त्यावेळी दौरा अर्धवट सोडून इंग्लंड संघाने परत मायदेशी यावे अशा सूचना कुणीही केल्या नव्हत्या. मग भारताबद्दलच रिची बेनॉ असं कां सुचवीत आहे?" असा परखड सवाल भारताचे माजी आघाडीचे गोलंदाज श्री. **रमाकांत देसाई** यांनी केला. श्री. देसाई पुढे म्हणाले, "प्रेक्षक वर्ग मग तो कोणत्याही देशाचा असो त्याची सहानुभूती आपल्या संघाकडेच असणार. आपला संघच जिंकावा असे त्याला वाटणार हा मनुष्यस्वभाव आहे."

"इंग्लंडचा प्रेक्षक वर्ग हा निःपक्षपाती असतो अशी त्याची जाहिरात केली जाते. याबाबत तुमचा अनुभव सांगाल काय?"

"इंग्लंडमधील प्रेक्षक हा क्रिकेटचा रसिक आणि जाणकार असतो. ज्या वेळी भारतीय संघ तेथे जातो त्यावेळी आपल्याकडे सहानुभूतीने पाहिले जाते. कारण भारतीय संघ कसोटी सामना जिंकणार नाही याची सर्वांना खात्री असते. परंतु ज्या वेळी तेथे ऑस्ट्रेलियाचा संघ जातो आणि रक्षाकरंडकाचा प्रश्न येतो त्यावेळी तेथील प्रेक्षकवर्ग हा खरोखरच निःपक्षपाती असतो काय हे पाहणे मनोरंजक ठरेल."

——मागील पानावरून——

"याचे कारण मला वाटते आजच्या तरुण पिढीत त्यासाठी जी चिकाटीने आणि सातत्याने वर्षानुवर्षे मेहनत करायला लागते, त्याचा अभाव आहे. लेगब्रेक, (यात गुगली आलीच), ही अत्यंत अवघड कला आहे. त्यावर प्रभुत्व मिळवायला फार मेहनत करावी लागते. पूर्वी आपल्याकडे सदू शिंदे, सी. एस्. नायडू, अमीर इलाही, सुभाष गुप्ते असे कितीतरी चांगले गोलंदाज झाले. मग आता कां होणार नाहीत?" श्री. बापू नाडकर्णी निर्धाराने म्हणाले.

## बापू नाडकर्णीला खोटे बाद ठरविले

पंचांच्या संशयास्पद निर्णयासंबंधी बोलताना श्री. रमाकांत देसाई म्हणाले, "व्यंकटराघवन प्रकरणासारखे संशयास्पद निर्णय तेथील पंचांनीही दिलेले होते; परंतु हे सर्व निर्णय भारतीय संघाला अनुकूल नव्हते तर ऑस्ट्रेलियाच्या संघाला अनुकूल होते. त्यामुळे दंगली होण्याचा किंवा प्रेक्षकांनी ओरड करण्याचा प्रश्नच नव्हता. तेथील पंचांच्या हातूनही असे संशयास्पद निर्णय दिले गेले होते. त्यावेळी भारतीय संघाने कुठे तक्रार केली? तेथील पंचांचे निर्णय मान्य केले असे एकादे उदाहरण द्याल का?

"सांगतो. भारताच्या ऑस्ट्रेलियातील मागील दौऱ्यात असे प्रसंग घडले होते. पहिल्याच कसोटी सामन्यात लॉरी आणि सिम्पसन यांच्याविरुद्ध भारतीय संघाने केलेली सर्व अपील्स फेटाळण्यात आली. त्या वेळी लॉरीने ४२ आणि सिम्पसनने शतक काढले. दुसरा प्रसंग ब्रिस्बेन येथील तिसऱ्या कसोटी सामन्यातील आहे. आपल्याला तो सामना अवघ्या ३८ धावांनी गमवावा लागला. बापू नाडकर्णीना ग्लीसनच्या गोलंदाजीवर असेच संशयास्पद पद्धतीने पायचीत देण्यात आले."

भारताच्या सध्याच्या निवडसमितीच्या धोरणासंबंधी बोलताना श्री. देसाई म्हणाले, "आपण केवळ फिरकी गोलंदाजांवर भिस्त ठेवून कसोटी सामने खेळतो हे योग्य नाही. प्रत्येक सामन्यात किमान दोन आघाडीचे गोलंदाज घ्यावेत. त्यामुळे तरुणांना प्रोत्साहन मिळेल. तसेच वयाच्या तिशीच्या आसपास चांगल्या, अनुभवी क्रिकेटपटूंची कसोटी क्रिकेटमधून आपण कायमची हकालपट्टी करतो हेही योग्य नाही. जो जो खेळाडू लायक असेल त्याला पहिली संधी दिली पाहिजे."

# अव्वल दर्जाचे

"भारतात कसोटी सामन्याच्या वेळी ज्या दंगली होतात त्यांची जबाबदारी मुख्यत्वे ते सामने भरविणाऱ्या कारभार यंत्रणेवरच आहे. त्याची सर्व जबाबदारी केवळ प्रेक्षकांवर आहे असे भासवून त्यांना त्यातून सहीसलामत सुटता येणार नाही." असे स्पष्ट शब्दात सांगून सुप्रसिद्ध क्रिकेटपटू, भारताचे माजी यष्टीरक्षक, मुंबई संघाचे माजी कर्णधार आणि भारतीय निवड समितीचे एक माजी सदस्य श्री. **माधव मंत्री** पुढे म्हणाले, "कसोटी सामन्याच्या सीझन तिकिटांचा काळा-बाजार होतो. वृत्तपत्रातून त्याची जाहीर वाच्यता होते. प्रेक्षक वाजवी दरापेक्षा जास्त पैसे देऊन ती तिकिटे खरेदी करतात. पण त्यांच्या पदरी कोणत्या सुखसोयी पडतात? तर जागा नसतानाही वाजवी-पेक्षा कितीतरी जास्त लोकांना ठराविक जागेत कोंबण्यात येते. तेथे ते पाच सहा तास बसून अथवा उभे राहून सामना पाहतात.

स्वतःची जागा सोडून खाण्यापिण्यासाठी जर मध्यंतराच्या वेळी बाहेर गेले तर पुन्हा ती जागा मिळण्याचा संभव नाही. अशा परिस्थितीत प्रेक्षक कंटाळले तर ती जबाबदारी कोणावर ?"

"मुंबईच्या सामन्याच्या वेळी जी दंगल झाली त्याची जबाबदारी प्रामुख्याने आकाशवाणीचे क्रिकेट समालोचक श्री. देवराज पुरी यांनी व्यंकटराघवन् बाद नसल्यासंबंधी आपला संशय व्यक्त केला त्यावरून घडली असं मला वाटते. श्री. देवराज पुरी यांनी पंचाच्या निर्णयावर मौन स्वीकारायला हवे होते असेही मला वाटते. त्यांनी आपल्याला 'एक्सपर्ट' म्हणून तुमचे मत काय असे विचारले होते. त्यावर तुम्ही पंचाच्या निर्णयावर मी स्वतःचं मत देणार नाही असे स्पष्ट सांगितलेत याबद्दल मी तुमचे अभिनंदन करतो," मी म्हणालो.

"पंचांचे निर्णय कसेही असोत ते खेळाडूंनी आणि प्रेक्षकांनीही संपूर्ण मान्य करायलाच हवेत हा क्रिकेटमधील शिरस्ता आहे. मी याचे पालन नेहमीच करीत आलो आहे," माधव मंत्री थोडे थांबून पुढे म्हणाले,

"या प्रकरणात देवराज पुरी इतकाच किंवहुना जास्त दोष खेळाडू व्यंकटराघवन याचा आहे. पंचाचा निर्णय कळला की खेळाडूने कोणत्याही परिस्थितीत तात्काळ तंबूत परत गेलेच पाहिजे. खिलाडूपणाने तो निर्णय स्वीकारलाच पाहिजे. व्यंकट राघवन थोडा वेळ थांबला नसता तर देवराज पुरीनाही असला संशय व्यक्त करण्याची संधीच मिळाली नसती."

"यामुळे परदेशात आपली नामुष्की झाली आहे. असा प्रकार पुन्हा होऊ नये म्हणून ट्रॅन्झिस्टर आणायला बंदी घालावी काय? दिल्लीच्या कसोटी सामन्यात अशी बंदी घातली असल्याचे मी वाचले आहे. या बाबतीत आपले मत सांगाल काय ?"

"ट्रॅन्झिस्टरवर बंदी घालायची ती प्रेक्षकांच्या दंगली होतील या भीतीने नव्हे, तर आकाशवाणीवरील समालोचन खेळणाऱ्या खेळाडूंना ऐकू जाते; त्यांची एकाग्रता होत नाही यासाठी. मुंबईच्या सामन्याच्या वेळी आम्ही जे बोलत होतो ते सर्व खेळाडूंना मैदानात ऐकू जात होते. त्याचा खेळावर परिणाम होतो."

# क्षेत्ररक्षण हवे

### —माधव मंत्री

**पंचांचे निर्णय संशयास्पद ?**

"आता आपण सिम्पसनच्या टीकेकडे वळूया. त्याच्या म्हणण्यात खरोखरच तथ्य आहे का ? की केवळ वृत्तपत्रात सनसनाटी बातम्या देऊन वाचकांचे लक्ष आपल्याकडे वेधून घेण्याचा तो प्रकार आहे ?"

"परदेशातील क्रीडा समीक्षक, वार्ताहर अशा बातम्या नेहमीच प्रसृत करतात. त्यांच्याकडे टेलिव्हिजन आहे. तसेच वृत्तपत्रांच्या सकाळ, दुपार आणि सायंकाळ अशा तीन आवृत्त्या निघतात. वाचकांचे लक्ष वेधून घेण्यासाठी असल्या खळबळजनक, सनसनाटी बातम्या छापल्या जातात. या दृष्टीने लॉरीने जे उत्तर दिले आहे तेच माझ्या मते योग्य आहे."



## रिची बेनॉचा भारतद्वेष ?

प्रख्यात ऑस्ट्रेलियन माजी क्रिकेटपटू रिची बेनॉ हा स्वतःला मोठा पत्रपंडित समजतो. जगाच्या पाठीवर कुठेही काहीही घडले की बेनॉचे त्यावर काहीतरी म्हणणे असतेच, मग तो स्वतः त्यावेळी त्या घटनास्थळी असो की चंद्रावर असो ! शिवाय त्याची टीका ही जणू स्फोटक असलीच पाहिजे असाही त्याचा समज आहे. ऑस्ट्रेलियाचा भारताबरोबरचा पहिला कसोटी सामना मुंबईत नुकताच पार पडला. त्यावेळी प्रेक्षकांकडून काही गैरकृत्ये घडल्याचे कळताच त्याने ताबडतोब एका ऑस्ट्रेलियन वृत्तपत्रातून 'लॉरीने आपला दौरा रद्द करावा' अशी मागणी केली आहे, ती त्याच्या आतापर्यंतच्या लिखाणाला साजेशीच आहे.

'लॉरीने सामना जिंकण्याची चूक केली' असे उपहासपूर्ण विधान करणाऱ्या याच बेनॉने दहा वर्षांपूर्वी त्याच्याच नेतृत्वाखालील ऑस्ट्रेलियन संघाला कानपूरला पराभव पत्करावा लागला होता, त्यावर भाष्य करताना भारतीय गोलंदाज जसू पटेल याच्यावर टीकेची झोड उठविली होती. बिच्चारा जसू पटेल ! त्याने आपल्या गोलंदाजीतील करामतीने आपल्या देशाला विजय प्राप्त करून दिला होता ना ! हा त्याचा गुन्हाच नव्हे का ? जसू पटेल म्हणे चेंडू नीट टाकण्याऐवजी 'फेकत' (थ्रो) होता. वेस्ट इंडीजबरोबर ऑस्ट्रेलियाचा सामना चालू असताना बेनॉने ग्रिफीथवर अशीच जहरी टीका केली होती. ग्रिफीथ चेंडू मारतो असा आरोप करणाऱ्या याच बेनॉने इंग्लंड-वेस्ट इंडीज सामन्याच्या वेळी मात्र ग्रिफीथच्या तशाच गोलंदाजीची स्तुती केली होती. बेनॉची ही देशभक्ती कौतुक करण्यासारखी आहे नाही ?

पाहुण्यांवर आतिथ्यशीलतेची वृष्टी करणाऱ्या भारताचा पाहुणचार स्वीकारूनही बेनॉला भारताबद्दल बराच राग दिसतो. तसे नसते तर वेस्ट इंडीज आणि पाकिस्तान येथे खेळांच्या वेळी झालेल्या दंगली आणि बाटल्यांची फेकाफेक याविरुद्ध चकार शब्द न काढणाऱ्या बेनॉने मुंबईच्या प्रकारानंतर ऑस्ट्रेलियन दौराच रद्द करण्याची हाकाटी केली नसती. कदाचित त्या








देशातून ऑस्ट्रेलियावर तसला प्रसंग गुदरला नसल्याने त्यांची दखल घेण्याची बेनॉला गरज भासली नसेल.

बेनॉने 'खिलाडू वृत्तीच्या तरुणांचा नेता' म्हणून बिल लॉरीचा गौरव केला आहे तोही मोठा गंमतीचा आहे. पंचाने मॅकेन्झीला गोलंदाजीचा प्रारंभ करण्यापूर्वी थोडा वेळ थांबविले म्हणून रागाने आपली टोपी जमिनीवर आपटणे ही खिलाडूवृत्ती असेल तर बिल लॉरी हा सर्व दिवंगत आणि हयात खेळाडूमधील सर्वोत्तम खिलाडू असे म्हणण्यास हरकत नाही. खेळत्पना इजा झालेल्या खेळाडूला 'रनर' देत असलेल्या पंचाशी वितंडवाद घालणे ही खिलाडूवृत्ती असेल तर त्यासाठी लॉरीला जरूर सुवर्णपदक द्यावे आणि बेनॉने स्वतःच ते लॉरीच्या छातीवर लटकवावे. उर्मट आणि अरेरावीचे वर्तन हे खिलाडूवृत्तीचे लक्षण असेल तर लॉरीला तसले पदक कायमचे वहाल करण्यास हरकत नाही.

गुन्हेगारी-वृत्त देण्याच्या कामावर असलेल्या वार्ताहर बेनॉला धोका आणि सुरक्षितता यातील फरक समजणे आवश्यक आहे. दि. ८ नोव्हेंबरला तो जर ब्रेबॉर्न स्टेडियमवर उपस्थित असता तर लॉरीच्या संघाच्या संरक्षणासाठी मुंबई पोलिसांनी आणि क्रिकेट क्लब ऑफ इंडियाने केलेल्या उपाययोजनांची त्याला समक्ष माहिती मिळाली असती. पण बेनॉ आणि त्याचाच वारसा चालवणारा सिम्प्सन यांना त्याची काय पर्वा !

– अरविंद लवकरे
(टाईम्स ऑफ इंडियावरून)

---

"मला वाटते इंग्लंड-ऑस्ट्रेलियातील पंचांना आपल्यापेक्षा जास्त सामन्यात काम करण्याची संधी मिळते हेही एक कारण असावे."

"हे अगदी बरोबर आहे. परंतु आपले पंचही चांगले अनुभवी असतात. विशेषतः कसोटी सामन्यांतील पंच हे सर्व पंचांतून अत्यंत हुशार, निष्णात आणि अनुभवी असेच निवडले जातात. चुका होणे हे मनुष्यस्वभावाला धरूनच आहे. त्यांचे पंच काय चुका करीत नाहीत? जागतिक कीर्तीचा इंग्लंडचा फ्रँक चेस्टर याच्या हातूनही चुका झालेल्या आहेत. परंतु त्यामुळे दंगली झाल्या नाहीत. आमचे पंच पाकिस्तानप्रमाणे पक्षपाती मात्र मुळीच नाहीत."

## झेल जिंकती सामने

भारतीय संघातील उणीवासंबंधी बोलताना श्री. **माधव मंत्री** म्हणाले, "कोणत्याही सामन्यात Catches Win Matches हे सूत्र आहे. भारतीय संघाचे क्षेत्ररक्षण ही चिंतेची बाब आहे. आजचे जवळजवळ सर्वच भारतीय खेळाडू हे तिशीच्या आतील आहेत. नवोदितांना संधी मिळत आहे. मग त्यांचे क्षेत्ररक्षणही निकृष्ट का ? नवोदितांपैकी एकट्या एकनाथ सोलकरचा अपवाद करता कोणाही खेळाडूचे क्षेत्ररक्षण आंतरराष्ट्रीय क्रिकेटच्या दर्जाचे नाही. क्षेत्ररक्षण जोपर्यंत सुधारत नाही तोपर्यंत आंतरराष्ट्रीय क्रिकेटमध्ये भारताला सन्मानाचे स्थान मिळेल असे वाटत नाही. आता न्यूझीलंडच्या संघाचे उदाहरण घ्या. त्यांची गोलंदाजी आपल्यापेक्षाही मर्यादित आहे; पण केवळ क्षेत्ररक्षणाच्या जोरावर त्यांनी केवढे स्थान मिळविले आहे? आपल्या आजच्या गोलंदाजाना जर चांगले क्षेत्ररक्षक रुसी सुर्ती, सोलकर यांच्या दर्जाचे मिळाले तर आपणही सामने जिंकू."

"सुर्तीवर या दृष्टीने अन्यायच झाला नाही ?"

"भारत आणि ऑस्ट्रेलिया या दोन्ही संघातील सर्वोत्कृष्ट क्षेत्ररक्षक म्हणून त्याचा आपण पारितोषिक देऊन गौरव केला. त्याचप्रमाणे त्याला ऑस्ट्रेलियातून बोलावून घेतले. या सर्व दृष्टीने विचार करता त्याला ठेवायला हवे होते. शिवाय, तो चांगला फिरकी गोलंदाज आहे. परंतु त्याचा उपयोग कुठे करून घेतला गेला ?"

"आज आपल्या देशात चांगला लेगब्रेक गोलंदाज का तयार होत नाही ?"

"सांगतो", मंत्री पुढे म्हणाले, "आजच्या आपल्या सर्व छोट्या छोट्या क्रिकेटच्या टूर्नामेंट्स् आहेत ना त्या सर्व पन्नास षटकांच्या गोलंदाजीवर खेळल्या जातात. त्यामुळे तरुण, होतकरू गोलंदाजाना अशा सामन्यातून पुरेशी संधी मिळत नाही. पुढे होणारे सर्व चांगले खेळाडू यातूनच तयार होतात. या सामन्यातून पन्नास षटकांच्या निर्बंधामुळे फिरकी गोलंदाजांना वाव नाही. शिवाय लेगब्रेक गोलंदाजी ही अत्यंत अवघड कला आहे." *

# खेळाडूला 'वयातीत' केव्हा ठरवावे ?

—मनोहर हर्डीकर

"भारतीय पंचांची कसोटी सामान्यासाठी निवड करण्याची पद्धतच सदोष आहे. कारण आमच्या पंचांची निवड होते ती परकीय कर्णधारांच्या शिफारशीवरूनच होय. अर्थात आमच्या पंचांना परदेशी कर्णधारांची मर्जी राखावीच लागते. समजा त्यांचा रिपोर्ट विरुद्ध असेल तर त्या पंचाची निवड पुन्हा होणार नाही. यासाठी ही पद्धतीच आमूलाग्र बदलावी लागेल" असे स्पष्ट उद्गार मुंबई संघाचे माजी कर्णधार श्री. **मनोहर हर्डीकर** यांनी माझ्याजवळ बोलताना काढले. श्री. हर्डीकर पुढे म्हणाले, "यासाठी मी असे सुचवीन की रणजी करंडक सामन्यातून जे पंच असतात त्या सर्वांचे रिपोर्टस् मागवून त्यांतील चांगल्या, अनुभवी आणि व्यासंगी अशा तीन चार पंचांचे एक पॅनेल तयार करावे आणि त्या निवडक पंचानीच सर्व कसोटी सामन्यातून काम करावे."

"पण ही गुणवत्ता ठरवायची कुणी ?"

"अखिल भारतीय पंचांची एक संस्था आहे, त्या संस्थेच्या कमिटीने आज होते काय की मुंबईच्या सामन्यासाठी कलकत्ता आणि

[ पान ४५ वर ]






अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





पत्रभूषण

# अर्जुनराव गादीगिर्दीकर

— प्रा. उत्तम शिरवळकर



संध्याकाळी एकटाच फिरायला बाहेर पडणार होतो. श्रावणातल्या शुक्रवारांचा 'नवरे' लोकांना हाच काय तो लाभ ! सौ. हळदीकुंकवाच्या मोहिमेवर 'सहशालू सहदागिने' बाहेर पडल्या होत्या. त्यामुळे 'ऐकलंत का ! झालं बरं का पाच मिटात' अशी ललकारी दर अर्ध्या तासाने ऐकत संध्याकाळची सुरम्य वेळ, कपडे चढवून अवघडलेल्या स्थितीत, घरातच घालवि-ण्याची पाळी आली नव्हती. घराबाहेर उशिरा पडल्यानंतर गजरेवाला दिसला घे गजरा, गर्दी दिसली धर हात, अर्ध्या मैलाचं प्रदीर्घ अंतर चालून दमलीस कर रिक्षा–असला प्रेमप्रदर्शनाचा जुलमाचा रामराम करण्याचीही गरज नव्हती.

मी आनंदाने घराबाहेर पडलो. तोच आमच्या वाड्यातल्या अर्जुनराव गादी-गिर्दीकरांनी मला आडवलं. काय म्हणता ऽऽऽ ? हे अर्जुनराव गादीगिर्दीकर कोण ? मनापासून विचारीत आहात ना ? का आपली गंमत करीत आहात ?

मला खरं वाटत नाही. आजकाल शिक्षणाचं प्रस्थ वाढल्यापासून वर्तमानपत्र न वाचणारा माणूस मिळणं कठीण झालं आहे. शहरातल्या लोकांचंच काय घेऊन बसला आहात ? खेड्यातला 'गन्या गनप्या' सुदिक येरवाळी वर्तमानपत्र–सॉरी पॅपर–घेऊनश्यानी कराकरा मांड्या खाजवीत नाहीतर निदानपक्षी पचापच थुकीत वाचीत बसतोय्, मग शेरातल्या जंटेलमनचा काय प्रश्न ?

सकाळी चहाबरोबर वर्तमानपत्रातल्या खमंग बातम्या चघळायला मिळाल्या-शिवाय आपल्याला चैन पडत नाही. प्रत्येक घरातला सकाळचा 'सीन' थोड्या फार प्रमाणात पुढीलप्रमाणे असायला हरकत नसावी.

'अहो, ऐकलत का! चहा निवून चाललाय् !'

'हं ऽऽऽ ! च्या मारी ! ही सुधा दिवगी भलतीच चलाख दिसतीये !'

'आँ ? कोण मेली ही सुधा दिवगी ?'

'माझ्या ओळखीची नाही ग. ही जाधव खून खटल्यातली सुधा ! पार पोलिसांना देखील चकवलं पट्टीने'!

'चकवील तर काय ! आजकालच्या या नटव्या पोरी दिसल्या की तुम्हा पुरुपांची अक्कल गहाण पडते ना! ते राहू द्या आता. चहा निवून चाललाय्.'

'चहा ना ? आलोच येवढं पुरं करून.'

'पुन्हा गरम करून मिळणार नाही हं ! ' इ. इ. इ. इ.

सारांश, वर्तमानपत्र हा आजच्या युगाचा परवलीचा शब्द आहे. आणि तुम्ही जर वर्तमानपत्र वाचीत असाल तर आमच्या

अर्जुनराव गादीगिर्दीकराचं नाव तुम्हाला माहीत असलंच पाहिजे. You must! प्रत्येक वर्तमानपत्राचा 'वाचकांचा पत्र-व्यवहार' या सदरात 'लेखक अर्जुनराव गादीगिर्दीकर' हे नाव आठवड्यातून कमीत कमी चार पाच वेळा तरी असतंच असतं.

अर्जुनरावांनी गेल्या तीन चार वर्षात पत्रलेखनाचा एवढा प्रचण्ड सपाटा मारला आहे की या अवधीत त्यांची कमीत कमी हजार दोन हजार पत्रं तरी निरनिराळ्या वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झाली आहेत. 'परमेश्वर इकडे लक्ष देईल काय?' 'तरुणांना वृद्धांचा जाच', 'तरुणांनो, वृद्धांचे ऐका', 'आमच्या स्त्रिया कोठे चालल्या आहेत?' 'स्त्रियांनो, पतिव्रतेचा आदर्श ठेवा', 'आमच्या स्त्रिया सुधारणेत कां मागासल्या', 'नगरपालिका की नगर-भक्षिका,' इत्यादि त्यांची पत्रे भयंकर गाजली.

अर्जुनरावांच्या पत्रांचं वैशिष्टय हेच की, त्यांची पत्रे समाजातल्या सर्व थरात आवडतात. एका वृत्तपत्रात सुधारलेल्या स्त्रियांना दोष देणारं पत्र असेल तर दुसऱ्या पत्रात 'स्त्रिया कधी सुधारणार' असा टाहो फोडायचा हे अर्जुनरावांचं खास टेकनिक् होतं. त्यामुळे प्रत्येक पक्षाचा, विचाराचा माणूस त्याला आपल्यातील एक मानायचा.

असे हे आमचे अर्जुनराव गादीगिर्दी-कर! वय वर्षे एकोणीस पूर्ण! पत्रलेख-नाच्या सामाजिक चळवळीमुळे एस्. एस्. सी. सारख्या क्षुद्र परीक्षेकडे दुर्लक्ष होऊन त्यांना गेल्या तीन खेपांना अपयश स्वीका-रावे लागले आहे. यावर्षी नापास झाल्याचे समजताच 'अर्जुनराव अभ्यासाकडे लक्ष देतील काय?' अशा शीर्षकाचं एक जबर-दस्त उपहासगर्भ पत्र त्यांनी लिहिलं होतं. पण पत्राचा कैफ उतरल्यानंतर आपली चूक त्यांच्या लक्षात आली व त्यांनी पत्र फाडून टाकले. तरीही 'या परीक्षा की कत्तलखाने' हे त्यांचे पत्र गाजलेच!

**...... एका रात्री खुद्द अर्जुनरावाच्या घरातूनच भांडणाचे मोठमोठे आवाज ऐकू येऊ लागले ... वाड्यातली माणसं आपल्या दारात उभं राहून त्या भांडणाचा वास घेऊ पाहात होती ...**

आमच्या संपूर्ण गल्लीत वयाच्या अवघ्या १९ व्या वर्षीच नावापुढे 'राव' लावून पचवलेला अर्जुनराव हा पहिलाच गृहस्थ (?) असावा. कुणालाही राव, पंत, साहेब असल्या शेपटचा लावण्याचा आमच्या गल्लीचा प्रघात नाही. पुरुषोत्तम कॉलेजात प्रोफेसर असला तरी गल्लीकरांना तो अजूनही 'पुर्प्या'च आहे. राम्या, लख्या, गोंधा, ममद्या, ही सिगारेटच्या अर्ध्या थोटकांसारखी नावे वयाची पन्नाशी उल-टून गेलेल्या माणसांची आहेत इतकं सांगि-तलं म्हणजे पुरे! तेव्हा अर्जुनरावाने इतक्या लहान वयात मिळविलेलं हे यश कौतुकास्पद नाही असं कोण म्हणेल?

'काय काका, कुठे बाहेर का?' मला आडवून अर्जुनरावाने प्रश्न केला.

'हो. का?'

'नाही, म्हटलं एकटेच?' अर्जुनरावाने खोचक स्वरात विचारलं.

त्याचा स्वर ऐकून मी दचकलो.

हल्ली अर्जुनरावाचा स्वर सतत खोच-कच असतो. त्याला बोलताना पाहून वाच-कांच्या पत्रव्यवहारातील एखादं खोचक पत्रच आपल्यापुढे उभं राहून बोलतंय असं वाटतं.

'एकटयाने फिरायला जाणारे नवरे विचार करतील काय?' हे काल्पनिक पत्र माझ्या डोळ्यांसमोर उभं राहिलं आणि घाईघाईने मी माझी बाजू मांडू लागलो.

'नाही, म्हणजे त्याचं काय आहे अर्जुनराव की, आज ती हळदीकुंकवाला गेलीय ना म्हणून एकटा जातोय मी!'

'काका, हे असले समारंभ सकाळीच कां उरकून घेत नाहीत? म्हणजे संध्या-काळच्या फिरण्यावर बोळा फिरायला नको'. अर्जुन ('स्त्रिया इकडे लक्ष देतील काय'च्या सुरात) म्हणाला.

'हं, हे बाकी बरोबर आहे हं तुमं म्हणणं?' मी होकार भरला.

'चला काका, आज मी तुम्हाला कंपनी देतो'. सेवाभाव चेहऱ्यावर आणीत अर्जुनने माझा ताबा केला.

आम्ही दोघे वाड्याच्या अंगणातून चालू लागलो. दरवाजाशी असलेल्या भणगे वकिलांच्या बिऱ्हाडात सासूसुनेचा 'नित्य' झगडा चालू होता. अर्जुन येताना दिस-ताच त्यांचे भांडण खाडकन् बंद पडले. 'शूऽऽऽ पत्र लेखक.....' असे दबलेले उद्-गारही ऐकू आले. आम्ही समोरून जाई-पर्यंत भणगे वकिलांच्या घरात 'नोबेल पारितोषिक' द्यावे अशी शांतता नांदत होती.

साऱ्या गल्लीने जणु अर्जुनरावाची धास्ती घेतली होती असे दिसले. तो येताना दिसताच जिकडे तिकडे शांततामय सहजीवनाचा मंत्रप्रभाव पडलेला दिसला. इतरांचं सोडा पण कोपऱ्यावरचा घिसुलाल मारवाडीदेखिल अर्जुनरावाला पाहताच वजनतागडीला झोका न देता माल देऊ लागला यावरून त्याचा वचक लक्षात यायला हरकत नसावी.

गल्लीकरांनी अर्जुनरावाची घेतलेली धास्ती अस्थानी नव्हती. गेल्या दोन चार वर्षात त्यांनी गल्लीकरांवर हजार दीड-हजार मेगॅटनी बॉम्बचा वर्षाव करून अने-कांना भुईसपाट करून टाकलं होतं. कुठल्या कुमुहूर्तावर त्याचं पहिलं पत्र सकाळकारांनी छापलं कुणास ठाऊक, पण तेव्हापासून सगळ्यांच्या मागे एक तापच लागला होता.

घिसुलाल मारवाड्याने तांदुळाची काही पोती एका मध्यरात्री आणून त्याच्या दुकानाशेजारच्या हवालदारांच्या घरात लपवून ठेवली होती. गल्लीतल्या सगळ्या

लोकांना हे गुपित माहीत होते. कारण प्रत्येक जण हवालदारांकडून काळयाबाजाराने तांदूळ खरेदी करीत होता. पण ही बातमी एके दिवशी 'व्यापाऱ्यांनो, नीतीमत्ता शिकाल काय?' या पत्राने उघडी पडली. अर्थात पोलीसांना त्यातला थोडासा लभ्यांश द्यावा लागण्यापलीकडे मारवाड्याला फारसा त्रास झाला नाही. पण तरीही घिसुलाल तेव्हापासून अर्जुनरावाला टरकून राहू लागला.

मधु कात्रे आणि शीला दानवे यांचे रम्य प्रेमकूजन गच्चीवर पाण्याच्या टाकीच्या आड निर्धास्तपणे चालू होते. अर्जुनरावाच्या लांब नाकाला हा वास लागलाच. लगेच 'प्रेम वागेत का पाण्याच्या टाकीमागे' या पत्राने शीलाचे आईबाप सावध झाले. त्या दिवशी गल्लीतल्या प्रत्येक तरुण मुलीचा बाप पाण्याच्या टाकीचा शोध घेत होता. त्यामुळे मधु कात्रेला पाण्याच्या टाकीच्या मागे अक्षरशः 'टाकीचे घाव' सहन करावे लागले.

एवंगुणविशिष्ट असा हा 'पत्रमय पिंड' माझ्याबरोबर आज फिरायला बाहेर पडत होता. पण काय असेल ते असो तो आज फारसा खुषीत दिसत नव्हता. त्याच्या बोलण्यातून त्याच्या नाराजीचं कारण समजल्यानंतर मला आनंदाच्या उकळ्या फुटू लागल्या.

'काका,' अर्जुनरावानें शवटी मनातली मळमळ व्यक्त केली.

'हल्ली माणसं फारच कायदेशीरपणे वागतात नाही?'

'म्हणजे काय?'

'अहो, गेल्या संपूर्ण दोन महिन्यात एका पत्राचाही मालमसाला मला मिळाला नाही.'

'कां वरं?'

'का वरं काय!' अर्जुनराव तणतणला. 'कुठे भांडण नाही. मारामारी नाही. पोस्टातले कारकून हल्ली वेळही लावीत नाहीत. नगरपालिका म्हणजे आम्हा पत्रलेखकांचं मायपोट. पण तेही वेटे आजकाल अगदी चोख कारभार करताहेत. रस्त्यावरचे दिवे वेळच्या वेळी लागतात. रस्ते कुठे खणून ठेवलेले नाहीत. दोन महिन्यात या प्रचण्ड देशातल्या एकाही मंत्र्याने एकही बेजबाबदार विधान केले नाही. आता हे दुर्दैव नाहीतर काय म्हणावे?' अर्जुनरावाने खिन्नपणे सुस्कारा सोडला.

'धीर सो गंभीर अर्जुन अऽऽराव! अरे, मिळेल एखादा प्रसंग. डोळे आणि कान उघडे ठेव म्हणजे झालं' मी वरवर सहानुभूती दाखवीत म्हणालो. (हो, नाही तर 'शेजाऱ्याकडे सहानुभूतीने पहाल काय?' 'हजर!')

लक्ष्मी रोडवरून फिरताना आम्हाला दोघांना एकत्र चालताही येत नव्हते अशी भयानक गर्दी होती. पोलीस हातात कर्णे घेऊन पादचाऱ्यांना दम भरीत होते. माणसंही मेंढरांप्रमाणे क्षणात फुटपाथवरून क्षणात रस्त्यावरून अशी खेचाखेच करीत होती.

अर्जुनरावाचा चेहरा चकाकला. आपल्या पत्रासाठी यापैकी एखादा प्रसंग उपयोगी पडणार अशी आशा त्याच्या डोळयात दिसत होती. मला मात्र त्याची ही स्थिती पाहून गंमत वाटत होती. लिहून लिहून संपलेला लेखक ज्याप्रमाणे त्याच त्याच पद्धतीच्या कथा दळतो. तशी वेळ अर्जुनरावावर फार लवकर आली यात शंका नाही.

'काका', अर्जुनराव उल्हासाने ओरडला. 'पुण्यातल्या रस्त्यांवर गर्दी फार वाढली आहे नाही?'

'होय बाळ अर्जुनराव!' 'नगरपालिका आंधळी आहे काय' या तुझ्या पत्रात तू तो मुद्दा छान मांडला आहेस. मला वाटतं पत्र क्रमांक

'आठ्ठावीस!' अर्जुनरावाने खिन्न स्वरात माझं वाक्य पूर्ण केलं. त्यानं आपल्या सगळ्या पत्रांना क्रमांक दिले. आहेत. आणि ते त्याला सगळेच्या सगळे पाठ आहेत.

'नाही पण या सिटी पोस्ट चौकातल्या ऑटोमॅटिक सिस्टीमपुढे उलट रहदारीला अडथळाच होतो नाही?'

'होय होतो, अर्जुना!' मी रंगात येऊन म्हणालो. 'पण 'हे ऑटोमॅटिक का वेळेचे खाटिक' या पत्रात तू....'

'पत्र क्रमांक सदतीस!' अर्जुनरावाचा चेहरा पार उतरला.

पण बराच वेळ त्याने चिवटपणा सोडला नाही. दुकानातील स्त्रियांची गर्दी, सायकलवाल्यांचा सुळसुळाट, रिक्षांचा बेफाटपणा, हॉटेलांची अस्वस्च्छता इ. दिसेल त्या विषयावर तो मोठ्या आशेने बोलायचा. पण यापैकी प्रत्येक विषय त्याच्या कुठल्या ना कुठल्या तरी पत्रात आलेला असल्याची जाणीव मी सूडकऱ्याप्रमाणे त्याला करून दिल्यानंतर त्याचा चेहरा पाहण्यालायक व्हायचा.

बराच वेळ आमच्या दोघात पुढीलप्रमाणे संवाद चालला होता—

## आमची भान-गडची सहल नि विनयभंग

**'दीपावली'च्या विनोदी साहित्य स्पर्धेतील तिसऱ्या पारितोषिकाचे मानकरी ठरलेले वरील साहित्य या अंकातील खास 'क्रिकेट पुरवणी'चा मजकूर वाढल्यामुळे या अंकात प्रसिद्ध होऊ शकले नाही. या दोन्ही बेफाम विनोदी कथा जानेवारी अंकात प्रसिद्ध होतील.**

**आपला अंक राखून ठेवा!**

**'दीपावली' कार्यालय, ४२ केनेडी ब्रिज, मुंबई-४**

'काका, पेढ्यात हल्ली खव्यापेक्षा साखरच फार वापरतात नाही?'

'होय! 'खवा हवा' या पत्रात तू ते मांडलंच आहेस'.

'हो, तेरा नंबरचं पत्र! पण पुण्याला आता दुमजली बसेस हव्यात नाही का?'

'yes' अर्जुनराव! 'एकमजली बस मिळाली तर मिळाली, !'

'हो, त्या पंचवीस नंबरच्या पत्रात मी लिहलंय् नाही का?' पण सिनेमातिकिटांचा काळाबाजार हा.

'पत्रक्रमांक ५६८!'

'इराणी हॉटेलवाले महाराष्ट्रीयनांपेक्षा चांगले वागतात नाही?'

'हो! क्रमांक ७११!'

'ह्या चौकातली गवळण.....'

'क्रमांक ३१२'

'लकडी पुलाची........

'१२४!'

असा प्रकार सुरू झाल्यानंतर मात्र अर्जुनराव पार खचला. घरी येईपर्यंत त्याने तोंडावाटे एक शब्दही पुन्हा काढला नाही. एकदा त्याने 'काका' अशी हाक मारताच मी '८०३' क्रमांकाची जाणीव त्याला करून दिली. अर्जुनराव पुरता ओशाळला. मी पोस्टात एका गावठी गिन्हाईकाला मोड न देता नगद नव्वद न. पै. कमावले होते. हर्षोन्मादाच्या भरात ही गोष्ट मी मोठ्याने सांगत असता अर्जुनरावाने ऐकली आणि 'पोस्टातली अंदाधुंदी' (क्र. ८०३) या पत्राने साऱ्या गल्लीत पसरवली. माझ्या मुलाचा, शाळेत नादारीचा फॉर्म भरला असता याच दुष्टाने 'श्रीमंतांनो, नादारी स्वीकारू नका' या पत्राने मला साऱ्या गल्लीत हास्यास्पद केले होते. या सगळ्या प्रकाराचा सूड घेण्याची संधी आज मला मिळत होती. जो जो या कारट्याचा चेहरा उतरत होता तो तो मला आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या.

त्यानंतर दोन तीन आठवडे असेच गेले. अर्जुनरावाचा चेहरा मुंबईच्या रेक्लमेशन भागाप्रमाणे दिवसेंदिवस खचत चालला होता. बरेच दिवसात दारूचा थेंब दृष्टीस न पडलेल्या मद्यप्यासारखी त्याची स्थिती झाली होती. त्याचे डोळे आतुरतेने भोवतालच्या स्थिरचरावरून फिरत होते. त्या डोळ्यात काकुळतीचा भाव दिसत होता. नाही म्हणायला अर्जुनरावाची आई फक्त फार आनंदात दिसली. पोस्टेजसाठी अर्जुनरावाना पैसे लागत नसल्याने तिच्या पेटीतली रक्कम यावेळी नेहमीप्रमाणे अदृश्य झाली नव्हती. गेल्या दोन वर्षात हरवलेली रक्कम 'किरकोळ' खात्यावर मांडून मांडून बिचारी माऊली बेजार झाली होती. यावेळी पै न् पै हिशोब जमल्याने ती खुषीत होती.

गल्लीतल्या लोकांमध्येही थोडंसं मोकळं वातावरण निर्माण झालं. दोन तीन महिन्यात अर्जुनरावाचं 'पत्रास्त्र' अस्तमान झाल्यामुळे लोकांची भीड हळूहळू चेपत गेली. आणि भीतीची जागा चेष्टेच्या स्वरांनी कधी घेतली हे कुणालाच समजलं नाही. पूर्वी अर्जुनरावाला महारोग्याप्रमाणे समजून टाळणारी माणसं आता हळूहळू त्याला मुद्दाम हाक मारून बोलावू लागली. चेष्टा टवाळी करून मूड उगवू लागली.

एकदा रात्री ११–१२ च्या सुमारास खुद्द अर्जुनरावाच्या घरातूनच मोठमोठ्याने भांडणाचे आवाज येऊ लागले. थोड्याच



अनुक्रमणिका







वेळात आवाजाची पट्टी चढली. वाड्यातली माणसं आपापल्या घरांच्या दारात उभी राहून गादीगिर्दीकरांच्या घरातल्या भांडणाचा वास घेऊ पहात होती. पण श्री. व. सौ. गादीगिर्दीकरांच्या प्रचंड आवाजाव्यतिरिक्त निश्चित असे शब्द कुणालाच ऐकू येत नव्हते.

खरे आजोबांना राहावलं नाही. आपल्या दारातून लगबगीने पुढे येत त्यांनी गादीगिर्दीकरांच्या घराच्या बंद खिडकीला कान लावून ऐकण्याचा प्रयत्न केला. पण गादीगिर्दीकरांनी खिडकी इतक्या जोरात उघडली की दाराची धडक बसून खऱ्यांचे कान 'खोटे' झाले. कानशिल चोळीत खरे बाजूला झाले. त्यांच्या कानशिलाचा बळी देऊन उघड्या खिडकीतून आतलं भांडण ऐकायला मिळणार म्हणून जिभल्या चाटणाऱ्या शेजाऱ्यांना निराशाच पत्करावी लागली. कारण खिडकी जोरात उघडण्याचे 'खरे' कारण पूर्ण झाल्यानंतर गादीगिर्दीकरांनी ती पूर्ववत् बंद करून घेतली. आणि मगच पुन्हा आपल्या 'बंद खिडकीमागील' प्रवेशास प्रारंभ केला.

अर्जुनरावाचे मातृपितृदेव भयंकर भडकलेले दिसले. अर्जुनच्या आईचा किनरा आवाज आणि वडिलांचा घोगरा आवाज दारं–खिडक्यांचा आडोसा दूर करून बाहेर पडत होता. पण शब्द कळत नव्हते. एखाद्या पट्टीच्या खानदानी गायकाने स्वरांचा चढउतार करावा पण गाण्याचे शब्द कळू नयेत तसा प्रकार होता.

आमची सगळ्यांची उत्सुकता विलक्षण ताणली गेली होती. पण शब्दही न कळल्याने आमची निराशा होत होती. थोड्याच वेळात गादीगिर्दीकरांच्या घरातून भूकंपाचे आवाज येऊ लागले. काठी, भांडी यांचा खणखणाट होऊ लागला. मग मात्र आमच्यातील वृद्धांनी दुसराच मार्ग चोखाळला. त्यांनी सगळ्यांनी मिळून गादीगिर्दीकरांच्या घराचं दार ठोठावलं. गादीगिर्दीकरांनी दार उघडलं.

'नमस्कार, भाऊसाहेब, हें हें हें, म्हटलं काय चाललंय् घरात' एका वृद्ध कवीने प्रश्न केला.

'ट्विस्ट डान्स चाललाय् ! येता का तुम्ही ?' भाऊसाहेब गादीगिर्दीकर उपहासाने उत्तरले.

त्यांच्या डोक्यावर चांगलं पेरूयेवढं टेंगूळ दिसत होतं.

'नाही, म्हणजे........' खरे आजोबा घुटमळले.

'नाही, म्हणजे दुसऱ्या कानावर फटका बसायला हवा'.

'गागि'कर म्हणाले.'

'काय ?' खरे अपमानाने ओरडले.

'get out !' गादीगिर्दीकर संतापाने थरथरत ओरडले.

'शरम नाही वाटत दुसऱ्याच्या भानगडीत नाकं खुपसायला ?'

'मिस्टर गादीगिर्दीकर' क्लार्क ऑफ दी कोर्ट वुचके दम भरीत म्हणाले. 'तुम्हाला एक्सप्लनेशन द्यावं लागेल हे लक्षात ठेवा.'

'अरे जारे कोटर्या ! म्हणे एक्सप्लनेशन द्यावं लागेल. तुला जन्माला घातल्याबद्दल बापाकडून घे एक्सप्लनेशन !' गादीगिर्दीकर भलतेच उखडले होते. त्यांनी दरवाजा पुन्हा फाडकन् बंद करून घेतला. आम्ही हिरमुसल्या चेहऱ्याने आपापल्या घरात परतलो.

दुसऱ्या दिवशी अर्जुनरावाचा चेहरा पाहताच आम्ही सगळेच दचकलो. गेल्या दोन महिन्यात दयनीय दिसणारा त्याचा चेहरा उजळला होता. पत्रलेखकाचं मध्यंतरी लुप्त झालेलं वारं त्याच्या डोळ्यात दिसू लागलं होतं. आता ही संक्रान्त कुणावर येते या काळजीने आम्ही सचित झालो होतो.

तीन चार दिवस काळजीतच गेले. आणि 'दै. ठणाणा'चा अंक पाहता पाहता मी आनंदाने उंच उडीच मारली. 'मातापित्यांचा झगडा मुलगा उघडा' या शीर्षकाचं ते पत्र होतं. आईबापांच्या भांडणात मुलाने कुणाची बाजू घ्यावी, असा रोकडा सवाल अर्जुनरावाने केला होता. एकमेकांच्या अंगावर फेकण्यात येणाऱ्या वस्तूंमुळे किती नासधूस होते, याचे मार्मिक चित्रण त्या पत्रात होते. थोडक्यात, बंद खिडक्यांमागला सगळा प्रकार त्या पत्रानं विस्ताराने वर्णन केला होता.

मी तात्काळ वर्तमानपत्र घेऊन घराघरात नेऊन दाखवलं. सगळ्यांची जिज्ञासा आकंठ तृप्त झाली.

त्यारात्री गादीगिर्दीकरांच्या घरात पुन्हा एकदा धांगडधिंगा, ओरडाआरडा झाला. पण दुसऱ्या दिवशी अर्जुनरावाचा सुजलेला चेहरा पाहताच काय प्रकार झाला असावा हे आम्हाला 'वाचकांचा पत्रव्यवहार' न वाचताच समजलं.

● ● ●

# आम्ही कृतज्ञ आहों !

'दीपावली'चा रजतमहोत्सवी दिवाळी अंक प्रसिद्ध झाला मात्र–वाचकांच्या अक्षरशः उड्या पडल्या; अंक हातोहात संपला. अंकासाठी अजूनही मागण्या येत आहेत, पण अंक शिल्लक नाहीत, त्यामुळे अंक पाठविता येत नाहीत. वाचकांच्या 'दीपावली'वरील लोभाबद्दल आम्ही कृतज्ञ आहों !

—संपादक





अनुक्रमणिका

संयुक्त राष्ट्र संघाचे सरचिटणीस दाग हॅमरशील्ड यांचा आठवा स्मृति दिन नुकताच साजरा झाला. त्यांचा मृत्यू अपघात, आत्मघात की घातपात यापैकी कोणत्या कारणाने घडला हे कोण सांगू शकेल ?....



# दाग हॅमरशील्डच्या मृत्यूचे गूढ

चित्तरंजन घोटीकर

१७ सप्टेंबर १९६१ ! रात्रौ १०-१५ ची वेळ ! या दिवशी नि या वेळी युद्धोत्तर जगाच्या इतिहासाचे एक दुःखद पान लिहिले गेले; युद्धोत्तर विश्वातील एका बुद्धिमान नि कर्तृत्ववान व्यक्तीच्या जीवनाची भीषण शोकांतिका या दिवशी नि या वेळीं घडली; असे कां व कसे घडले या प्रश्नांनी सबंध जगात विलक्षण खळबळ माजली.

आफ्रिकेतील ऱ्होडेशियाच्या 'नदोला' या विमानतळाच्या पश्चिमेकडील दहा मैल दूरवरच्या निबीड जंगलात 'अल्बर्टिना' नावाचें विमान कोसळून त्याचा चक्काचूर झाला. त्यात प्रवास करीत असलेले सर्व उतारू ठार झाले. याच विमानातून त्या वेळचे संयुक्त राष्ट्रसंघाचे –यूनोचे–सरचिटणीस दाग हॅमरशील्ड हे काँगोचे त्यावेळचे पंतप्रधान शोंबे याना भेटावयास निघाले होते. यूनोच्या फौजा नि काँगोचे सुरक्षादल यांच्यात तेढ निर्माण झाली होती. या दोन फौजांतील संभाव्य संघर्षाने निर्माण होणारे यादवी युद्ध टाळण्याची अतिशय अवघड जबाबदारी हॅमरशील्ड यांच्यावर टाकण्यात आली होती. ती पार पाडण्याच्या जिद्दीने ते काँगोकडे शोंबेना भेटण्यास चालले होते. 'अल्बर्टिना' अपघातात पेटून नष्ट झाले नि हॅमरशील्डसकट त्यातील सर्व प्रवासी मृत्यूमुखी पडले. जो एक सुदैवाने वाचला होता तोही–हॅरॉल्ड ज्यूलीयन–पाच दिवसानंतर मरण पावला. पण त्याने मृत्यूपूर्वी दिलेली जबानी फार महत्त्वाची ठरली.

या भीषण विमान अपघाताच्या कारणमीमांसेबद्दल दोन वेगवेगळ्या चौकशी मंडळानी शोध घेण्याचा प्रयत्न केला. एक चौकशी ऱ्होडेशियाच्या सरकारने केली व "वैमानिकाच्या चुकीमुळेच अपघात घडला" असा निष्कर्ष काढला. दुसरी चौकशी खुद्द संयुक्त राष्ट्रसंघाने केली व या चौकशी मंडळाने अपघाताचे निश्चित असे कोणतेही कारण नमूद न करता, "घातपाताची शक्यता" सूचित केली.

या अपघातावर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न अमेरिकेतील 'फॅक्ट' (Fact) नावाच्या एका मासिकाने केला असून हॅमरशील्डच्या मृत्यूची पार्श्वभूमी शोधण्याची पराकाष्ठाही, उपलब्ध पुराव्याच्या आधाराने, केली आहे. हॅमरशील्डना अत्यंत नैराश्यपूर्ण मनःस्थितीत मृत्यू आला, इतकेच नव्हे तर अत्यंत निर्घृण मार्गानी त्यांनी आपल्या जीवनाचा नि त्या बरोबरच आपल्या सह-प्रवाश्यांचा अंत घडवून आणला असा चित्तथरारक निर्णय 'फॅक्ट'ने काढला आहे; अगदी सबळ पुराव्यानिशी !

सर्व जगात या 'फॅक्ट'मधील लेखामुळे खळबळ माजली. विचारवंतांनी, बुद्धिवाद्यांनी, तत्त्वज्ञान्यांनी नि राजकारण्यांनी खूप तर्कवितर्क केले; विचारमंथन केले.

दाग हॅमरशील्ड ही युद्धोत्तर जगातील एक थोर, कर्तृत्ववान नि बुद्धिवान व्यक्ती होऊन गेली, इतक्या श्रेष्ठ व्यक्तीची अपघाताच्या वेळी काय मनःस्थिती होती नि कोणत्या घटनांमुळे त्यांना मृत्युमुखीं पडावे लागले. इ० विषयांवर प्रकाश पडण्याची शक्यता निर्माण झाली आहे. त्याचबरोबर हॅमरशील्ड यांच्या शत्रूंनीच त्यांचा अंत घडवून आणला असे जे तर्क केले गेले त्यावरही पडदा पडण्याची शक्यता आहे.

## 'फॅक्ट'चा निष्कर्ष ... आत्महत्त्या

अत्यंत निष्ठुर मार्गानी हॅमरशील्डनी आत्महत्त्या केली असावी या निर्णयाच्या पुष्ट्यर्थ 'फॅक्ट'ने काही पुरावेही सादर केले आहेत. त्यामध्ये (१) हॅमरशील्ड यांची दैनंदिनी (Markings) व तिच्यामधील त्यांचे आत्मचिंतन व टिपणी हा महत्त्वाचा पुरावा होय. या दैनंदिनीच्या चार आवृत्त्या इंग्लंडमध्ये निघाल्या. या दैनंदिनीमधील अनेक नोंदींवरून हॅमरशील्ड हे चमत्कारिक मनोविकारांनी पछाडले गेले होते असा विचार 'फॅक्ट'ने व्यक्त केला असून, आत्महत्त्येच्या प्रबळ विचारांनी त्यांना पछाडलेले होते असे मत












अनुक्रमणिका

व्यक्त केले आहे. (२) कांगोमधील अस्थिर राजकीय परिस्थितीत भराभर घडत गेलेल्या नाट्यमय घटनांचीही परिणती त्यांच्या मृत्यूत झाली; जगणे त्याना केवळ अशक्यप्राय झाले. (३) प्रत्यक्ष विमान अपघाताच्या वेळी घडलेल्या घटना.

ऱ्होडेशियाच्या सरकारने केलेल्या चौकशीत 'घातपाताची शक्यता' झिडकारण्यात आली. तथापि, यूनोने केलेल्या चौकशीत मात्र ही शक्यता धरण्यात आली. 'फॅक्ट'च्या निष्कर्षानुसार हॅमरशील्डनी 'अल्बर्टिना' विमानात स्वतःबरोबर आणलेल्या टाईम-बाँबच्या प्रचंड स्फोटामुळेच विमानाच्या ठिकऱ्या उडाल्या; एवढेच नव्हे, तर हा स्फोट हॅमरशील्ड यांनी स्वतःच स्वहस्ते केला होता.

हॅमरशील्ड यांची दैनंदिनी (जिला त्यांनी Markings असे नांव दिले होते) ही त्यांची व्यक्तीगत व खाजगी पुस्तिका होती. त्यात घटनांची यादी नसून त्यांच्या आत्मचिंतनपर विचारांची, ईश्वरविषयक विचारांची ती एक मालिकाच होती. ते लिहितात–"माझ्याबद्दलच्या टिपणींवरून माझ्या स्वभावाची, सवयींची व्यक्तित्वाची नि प्रवृत्तींची कल्पना येईल–" या नोंदीवरून हॅमरशील्ड विलक्षण एकलकोंड्या प्रवृत्तीचे होते असे दिसते. त्यांचे वडील जनतेत अतिशय अप्रिय असे स्वीडनचे पंतप्रधान होऊन गेले. वडील या नात्यानी ते जुलमी प्रवृत्तीचे होते.



मुलगी व्हावी अशी तीव्र इच्छा असतानाच हॅमरशील्ड यांचा जन्म झाल्यामुळे त्यांची या मुलावर इतराजी झाली होती. हॅमरशील्ड दैनंदिनीत लिहितात–"प्रत्येक कृती व नात्यागोत्याचे संबंध गुप्ततेच्या वातावरणानी झाकाळून गेले आहेत. मित्रत्वाची भावना शब्दांनी वर्णन करणे अशक्य आहे. मैत्री म्हणजे एकांतवास नाहीसा करण्यासाठी मिळालेली ईश्वरी देणगीच होय!" 'फॅक्ट'च्या मते हॅमरशील्ड यांचे ठायी काही विकृती होत्या नि त्यांच्या दैनंदिनीत त्यांच्या या विकृती (Aberrations) सूचित करणाऱ्या खाणा-खुणा आहेत. या विकृतींमुळे त्यांचा एकलकोंडेपणा वाढतच गेला. पुढे ते लिहितात–"मी एकटा आहे–एकटा आहे–आकाशातील तारे हे माझे मित्र आहेत–एकांतवास म्हणजे परमेश्वराशी स्नेह जोडणारा पूलच –मानवी जीवनाच्या निबीड जंगलातच सत्ता, वैभव व विलास यांच्या प्राप्तीकरिता युद्ध खेळले जाते––मानवी आयुष्याच्या शोकांतिकेतून नि पराजयातून मुक्त होण्याचा एकमेव मार्ग म्हणजे मृत्यूस धीरोदात्तपणे कवटाळणे–" म्हणूनच 'फॅक्ट'च्या मते हॅमरशील्ड यांच्या मनात आत्यंतिक एकलकोंड्या प्रवृत्तीमुळे स्वनाशाचे विचार तीव्रपणे येत होते. आणि हीच त्यांची चमत्कृतीजन्य मनोवृत्ती होय. त्यांच्या मनातील विकार ही वास्तवतेपासून त्यांची झालेली फारकत होती. त्यांच्या टिपणींसुद्धा पुढे पुढे आत्मवंचनेच्या भावनेनी माखल्या होत्या. त्यानी पुढे विचार व्यक्त केले आहेत–"मृत्यू ही मानवाला लाभलेली मोठी ईश्वरी देणगी होय–ज्यानी ईश्वरशरणागतीची कल्पना मान्य केली आहे त्यानाच, मानवी जीवनाची सफलता क्रूसावर जाण्यानेच होणार आहे, हे तत्त्वज्ञान पटेल–" मृत्यूसंबंधीचे त्यांचे विचार इतके स्वच्छ नि स्पष्ट होते की, त्यांच्या मनात मृत्यूनेच घर केले असले पाहिजे यात नवल नाही. त्यांच्याच शब्दात सांगायचे तर–"त्यागाचा एक महत्त्वाचा घटक म्हणजेच मृत्यू; आत्मविमोचन!"

## दैनंदिनीतील विशिष्ट उतारे

हॅमरशील्ड यांच्या मनःस्थितीची कल्पना येण्यासारखे इतर पुष्कळच लिखाण त्यांच्या दैनंदिनीत आहे. ११-९-१९६१ रोजी, म्हणजे त्यांच्या मृत्यूचे सहाच दिवस अगोदर, त्यानी आपले मृत्यूपत्र तयार केले होते. त्यात त्यांनी स्पष्ट सूचना दिली होती–"माझी सर्व खाजगी कागदपत्र स्वीडनच्या परराष्ट्र खात्याचे प्रमुख मंत्री मि. पर्लिंड यांच्या स्वाधीन करण्यात यावीत." पर्लिंड हे हॅमरशील्ड यांचे १९५३ ते १९५६ दरम्यान वैयक्तिक चिटणीस होते. हॅमरशील्ड स्वतः मार्टिन ब्यूबरच्या Ictt UND DU या ग्रंथाचे भाषांतर करीत होते. त्यांच्या स्टॉकहोम येथील प्रकाशकाना त्यांच्या सहीचे एक पत्र विमान अपघाताच्या दुसऱ्या दिवशी–म्हणजे १८-९-१९६१ रोजी–मिळाले होते. त्यात त्यानी प्रकाशकांना लिहिले होते–"मी भाषांतर लौकरच पुरे करून आपणाकड पाठवीत आहे. त्याच्या विक्रीमुळे जे पैसे मिळतील ते सर्व कुठल्यातरी लोकोपयोगी संस्थेस दान करावेत."

विमान अपघातानंतर त्यांच्या दैनंदिनीच्या हस्तलिखितासोबत, त्यांच्या न्यूयॉर्क येथील निवासस्थानात, एक पत्रही सापडले. हे पत्र त्यानी स्वीडनच्या अंडर सेक्रेटरीना–म्हणजे लेफ् बेलफराज याना–लिहिले होते. त्यात हॅमरशील्ड लिहितात, "प्रिय लेफ्! तुला आठवत असेलच की, अनंत व्याप सांभाळूनही मी माझी दैनंदिनी लिहीत असल्याचे तुझ्याजवळ बोललो होतो. हीच, बघ ती दैनंदिनी! ही दैनंदिनी तू आपल्याजवळ जपून ठेवावीस अशी माझी इच्छा आहे–मी ती तुझ्याकरिताच ठेवीत आहे. माझ्या व्यक्तिमत्वाची, चिंतनाची, विचारांची, नि प्रवृत्ती-प्रकृतीची तीमधील टिपणी पाहून तुला कल्पना येईल. मी परमेश्वराशी केलेली बातचीत तुला त्यात आढळेल. . तुला जर ही दैनंदिनी प्रकाशित करण्याच्या लायकीची वाटली तर तसे करण्यास माझी तुला अनुमती आहे. ."








"नाश्त्याबरोबर मी नेहमी तांबं खातो !"



शिवाय लोह, कॅल्शियम अन् आयोडिन खातो ते वेगळंच. खरं तर हे सदगृहस्थ ८ महत्त्वाची खनिज द्रव्ये अन् ११ अत्यावश्यक जीवनसत्त्वे घेत असतात. निरोगी जीवनाला अपरिहार्य असलेली ही सारी द्रव्ये व्हिमग्रॅनच्या अवघ्या एका टॅब्लेटमध्ये सामावलेली असतात. नुसतेच आरोग्य नाही तर उत्साह अन् प्रखर रोगप्रतिबंधक शक्ति यांसाठी आवश्यक असणारी सारी जीवनसत्त्वे व खनिज द्रव्ये व्हिमग्रॅनमध्ये आहेत. उदाहरणच द्यावयाचे झाले तर तांबं घ्या. ताज्या रक्ताची निर्मिती अन् कामासाठी लागणारा उत्साह आपल्याला या खनिजामुळे मिळतो. व्हिमग्रॅनमधील इतर जीवनसत्त्वे व खनिज द्रव्ये नियमित घेतल्याने या सदगृहस्थांची त्वचा अन् दृष्टी अतिशय निरोगी राहिली असून त्यांचे दात अन् हाडेही पूर्वी कधी नव्हती एवढी कणखर आहेत.

# व्हिमग्रॅन®

अनेकविध जीवनसत्वे
व खनिजे असलेल्या टॅबलेटस्






व्हिमग्रॅनची अवधी एक टॅबलेट दिवसासाठी लागणारा सारा उत्साह मिळवून देते.

® हा रजिस्टर्ड ट्रेडमार्क ई.आर. स्क्विब अँड सन्स यांचा असून तो वापरण्याची अनुमती करमचंद प्रेमचंद प्रा. लि. यानी मिळविली आहे.

SQUIBB®
SARABHAI CHEMICALS

Shilpi SC 7/69 MAR







अनुक्रमणिका

या पत्रावरूनही 'फॅक्ट' मासिकाने निष्कर्ष काढला आहे की, आत्मनाशाचेच विचार त्यांच्या मनात प्रबळ असले पाहिजेत.

प्रत्यक्ष विमान अपघाताच्या वेळच्या राजकीय घडामोडींचा रागरंग पाहिल्या-वर 'फॅक्ट'ने मत व्यक्त केले आहे की, हॅमरशील्ड यांचे काँगोमधील धोरण पूर्णपणे अयशस्वी झाले होते. १९६१ चा सप्टेंबर महिना यूनोच्या आयुष्यातला मोठ्या अग्निदिव्याचा काळ ठरला. कटांगा प्रांत तांब्याच्या उत्पादनाकरिता जगात प्रसिद्ध आहे. शोंबेंच्या नेतृत्वा-खाली कटांगापासून कांगो एकच वर्ष अगोदर फुटून निघाला होता. १९६१ च्या ऑगस्टमध्ये यूनोच्या फौजा शोंबेंच्या सैन्यावर विजय मिळविण्याच्या मार्गावर होत्या. पराभव टाळावा म्हणून शोंबेही समझोता करण्यास तयार होता. कांगो-तल्या बेल्जियन वकिलानेही बेल्जियन अधिकाऱ्यांना काँगोमधून काढून घेण्याची तयारी दाखविली होती. हॅमरशील्डना हे मान्य होते. त्याप्रमाणे यूनोच्या फौजांनीही कारवाई स्थगित केली होती. तथापि, खुद्द बेल्जियन सरकारनेच आपल्या काँगोतील वकिलाची वरील सूचना धुडका-वून लावली. परिणामी यूनोच्या फौजांचा पाणउतारा केल्यासारखे झाले. इंग्लंडचे यूनोतील प्रतिनिधी सर पॅट्रिक डीन यानी या प्रकरणात यूनोवर कडाडून टीका केली, की यूनोनी कांगोमध्ये अधिकारबाह्य कृती केली आहे. या टीकेमुळे कांगो-कटांगा-कडे सहानुभूतीने पहाणाऱ्या टोरी खास-दाराना आनंदाच्या उकळ्या फुटल्या. "टॅंगानिका कन्सेशन्स" या कटांगातील इंग्लिश कंपनीचे प्रमुख चार्लस् वॉटर-हाऊस हे स्वतः टोरी खासदार होते. त्यानी पॅट्रिक डीनच्या टीकेचे स्वागत केले.

या सर्व विचित्र नि अस्थिर राजकीय परिस्थितीच्या पार्श्वभूमीवरच हॅमरशील्ड स्वतः १३-९-१९६१ रोजी, धुमश्चक्रीच्या ऐन भरात, कांगोकडे 'अल्बर्टिना' या विमानाने निघाले होते. ते आल्यावर दोनच दिवसात यूनोच्या नि कांगोच्या फौजात चकमक उडाली. ईश्वरावर नि अहिंसेवर श्रद्धा असणाऱ्या हॅमरशील्ड यांच्यावर ही बंडाळी थांबविण्याची अवघड जबाब-दारी पडली. शोंबेना भेटून युद्ध स्थगित करण्याचा त्यांचा हेतू होता. ही भेट घेण्या-करताच ते १७-९-१९६१ रोजी ते ऱ्होडेशियाच्या 'नदोला' या विमानतळाकडे निघाले होते. 'नदोला' हा विमानतळ 'कटांगा' व 'ऱ्होडेशिया-न्यासालंडच्या संयुक्त राज्यांच्या' सीमारेषेवर होता.

'अल्बर्टिना' विमानाचा कॅप्टन हॉलन-क्विस्ट हा एक अनुभवी वैमानिक होता. लिओपोल्डव्हिलाच्या 'निजली' या विमान-तळावरून त्याने 'नदोला'कडे दुपारी ३ वाजून ५१ मिनिटानी उड्डाण केले. हे अंतर १,५०० मैलांचे होते. सहा तासाच्या प्रवासानंतर—म्हणजे रात्री ९ वाजून ५५ मिनिटानी—हॉलनक्विस्टने 'नदोला' विमान-तळाचे प्रमुख कंट्रोलर कॅम्पबेल मार्टिन यांच्याशी पहिला संपर्क साधला. मार्टि-नच्या म्हणण्याप्रमाणे त्यावेळी विमान ५० मैल दूर होते. मार्टिनने विमान सुरक्षितपणे उतरविण्याच्या नित्याच्या सूचना दिल्या. तथापि, 'विमान रात्रभर 'नदोला' विमानतळावर थांबणार नसून, पेट्रोल घेण्याकरिताच केवळ किंचित् काळ थांबणार आहे' अशी सूचना हॉलनक्विस्ट-कडून मिळताच मार्टिनला आश्चर्य वाटले. म्हणून मार्टिनने "विमान कुठे जाणार आहे? सॅलिसबरीकडे की इतरत्र? किती प्रवासी आहेत?" इत्यादी प्रश्न केले. त्यावर उत्तर आले, "सर्व माहिती विमान पेट्रोलकरिता उतरेल तेव्हाच मिळेल."

रात्री बरोबर १० वाजून १० मिनिटानी हॉलनक्विस्टन मार्टिनला संदेश दिला, "विमानतळावरील दिवे दिसू लागले—विमान उतरविण्याच्या मी तयारीत आहे—" मार्टिनने प्रत्युत्तर केले, "१६,००० ते ६,००० फुटांच्या दरम्यान विमान उतरविण्यास हरकत नाही... इतक्यात धावपट्ट्यावर उतरू नये.. पुढील सूचनांकडे लक्ष द्यावे.

त्यानंतर पुढील संदेश येण्याचे एकदम बंद झाले—कायमचे बंद झाले. त्यानंतर पाचच मिनिटाच्या अवधीत 'नदोला'च्या आसपास, ऑलिव्ह अँडरसन नावाच्या बाईने तीन भयानक कर्कश आवाज ऐकले. अनेक पोलिसानीही ज्वाळांचा प्रचंड लोळच्या लोळ पाहिला. 'अल्बर्टिना' पेटून कोसळल्याची ही बातमी होती हे उघड आहे.

### प्रवाशाची मृत्यूपूर्व जबानी

या भीषण अपघातानंतर १५ तासानी विमानाचे तुकडे सापडले. विमान कोसळ-ल्यानंतर त्याचा शोध घेण्यास इतका उशीर लागला याचा अर्थ एकच; तो म्हणजे 'नदोला' विमानतळावरील अधि-काऱ्यांची अक्षम्य बेपर्वाई. रात्री १० वाजून १५ मिनिटानी विमान कोसळल्या-नंतर सकाळी ८ वाजेपर्यंत कुठलीही हाल-चाल नव्हती. १५ तासानंतर जळून गेलेले



अनुक्रमणिका

विमानाचे तुकडे पोलिसांना जंगलात सापडले. हॅमरशील्ड यांचा जळून कोळसा झालेला देहही दूरवर फेकला गेलेला सापडला. सर्वच देह जळून खाक झाले होते. फक्त एकच प्रवासी–यूनोच्या कांगोमधील फौजांचा प्रमुख संरक्षक सार्जंट हॅरॉल्ड ज्यूलीयन–कसाबसा तग धरून होता. तोही खूप जखमी झाला होता. पाच दिवसानंतर तोही मेला. तथापि, मृत्यूपूर्वी त्याने अतिशय महत्त्वाची जबानी दिली. 'नदोला'च्या पोलिस प्रमुखाने–अल्फ्रेड अॅलनने–ज्यूलीयनची मृत्यूपूर्वीची जबानी हॉस्पिटलमध्ये घेतली. या दोघांमध्ये खालीलप्रमाणे प्रश्नोत्तरे झाल्याचे ऱ्होडेशियन सरकारने नेमलेल्या चौकशी-मंडळाने नमूद केले आहे.

**अॅलन**:–वैमानिकाशी शेवटचा संपर्क साधण्याचे वेळी तुम्ही विमानतळावरील धावपट्टीवर होता ना ?

**ज्यूलियन** :–होय ! त्याच वेळी विमानाच्या ठिकऱ्या उडाल्या.

**अॅलन** :–विमान धावपट्टीवर असतानाच हे घडले काय ?

**ज्यूलीयन** :—होय.

**अॅलन** :–पुढे काय घडले ?

**ज्यूलीयन** :–विमान भरवेगात असून उतरण्याच्या तयारीत होते. त्यानंतर भयानक कर्कश आवाज झाला. मी जीव घेऊन पळालो नि बाहेर उडी मारली.

**अॅलन** :–इतर प्रवाशांचे काय झाले ?

**ज्यूलीयन** :–ते विमानातच कोंडले गेले.

ज्या इस्पितळात ज्यूलीयन होता तेथील एका परिचारिकेने सांगितले की, 'हॅमरशील्डनी विमान परत फिरविण्याचा आदेश वैमानिकास दिला नि क्षणार्धातच भयानक स्फोट झाला', असे ज्यूलीयनने तिला सांगितले.

यूनोने व ऱ्होडेशियाच्या सरकारने नेमलेल्या दोन्ही स्वतंत्र चौकशी मंडळानी, विमानातील तीन उताळूंच्या शरीरात घुसलेल्या गोळ्यांचा खास करून विचार केला होता. दोन्ही चौकशी मंडळांचे एका प्रश्नाबाबत मात्र एकमत झाले. ते म्हणजे अपघाताचे वेळी विमानातल्या दारूगोळ्याचा प्रचंड स्फोट होऊन त्याचेच तुकडे या प्रवाशांच्या शरीरात घुसले असले पाहिजेत. तथापि अनेक तज्ज्ञांमध्ये (Ballistic Experts) याबाबतीत तीव्र मतभेदही झाले.

वरील सर्व उपलब्ध पुराव्याचा साकल्याने विचार करून 'फॅक्ट' या मासिकाने अपरिहार्य असा निष्कर्ष काढला आहे की, हॅमरशील्ड यानी स्वतःच टाईम-बाँब विमानात लपवून ठेवला होता व त्यांचा स्फोट घडवून आणला. हा बाँब त्यानी कसा नि कुठून पैदा केला हे गूढच आहे. विमान उडत असताना त्याचा स्फोट करता येईल ही त्याना आशा होती. तथापि, असा स्फोट करणे त्यांच्या आवाक्याबाहेर गेल्याचे दिसताच त्यानी वैमानिकास उलट-सुलट सूचना देऊन विमान उतरविण्यास मुद्दाम दिरंगाई केली. टाईम-बाँब त्यांच्या संरक्षकास दिसला होता नि त्याचा स्फोट हॅमरशील्ड करण्याच्या तयारीत आहेत हे त्याच्या लक्षात येताच त्या भीषण कृत्यापासून हॅमरशील्डना परावृत्त करण्याची त्यानी शिकस्त केली. या झगडयात हॅमरशील्डनी जवळच्या पिस्तुलाच्या गोळयानी त्याना यमसदनास पाठविले असले पाहिजे. तीन प्रवाशांच्या शरीरात घुसलेल्या याच त्या गोळ्या असाव्यात.

'फॅक्ट' मासिकाचा हा निष्कर्ष तर्कास कितपत धरून होईल हे ज्याने त्याने ठरवावे. तथापि, असा काहीसा प्रकार घडला असल्याची शक्यताही नाकारता येणार नाही. यूनोने केलेल्या चौकशीत 'घातपाताची शक्यता' नमूद केलेली होती हेही विसरून चालणार नाही.

दाग हॅमरशील्ड यानी आत्महत्त्याच केली याबर 'अॅसोसिएटेड प्रेस'चे वार्ताहर आॅर्थर गॅव्हसन यांचा विश्वास आहे. गॅव्हसनने "हॅमरशील्ड यांचे अखेरचे दिवस"– "The last days of Dag Hammarskjold" हे पुस्तक लिहिले असून ते "व्हॅरी अँड रॉकलिफ्" या प्रकाशकानी १९६३ मध्ये प्रकाशित केले आहे. तथापि, विमान अपघाताच्या कारणांबाबत मात्र गॅव्हसन अनिश्चित मनस्थितीत आहेत. पण हॅमरशील्डनी आत्मनाश केला यावर त्यांचा विश्वास आहे. स्वीडनचे विख्यात अर्थशास्त्रज्ञ, वकील, सामाजिक कार्यकर्ते व हॅमरशील्ड यांचे स्नेही जॉन लिंडबर्ग लिहितात, "त्यानी (हॅमरशील्डनी) आत्महत्याच केली यावर माझा पूर्ण विश्वास आहे. त्यांच्यासारख्या विद्वान, बुद्धिमान नि स्वतःच्या असामान्य कर्तृत्वावर श्रद्धा असणाऱ्या व्यक्तीच्या अहंकारास व प्रतिष्ठेस कांगोतील अपयशाच्या भावनेने प्रचंड तडाखा बसला. म्हणूनच आत्महत्त्येचा निर्वाणीचा मार्ग त्यानी स्वीकारला असला पाहिजे."

खरोखरच हॅमरशील्डनी स्वतःच्या अमोल जीवनाचा असा निर्घृण शेवट करून घेतला असेल काय ? 'हो' किंवा 'नाही', असे निश्चित उत्तर देणे कठीण आहे. तसेच हा आत्महत्त्येचा प्रकार नसावा असेही ठरविणे अशक्य आहे. या सर्व शोकांतिकेवर संशयाचे, गूढतेचे व अनिश्चिततेचे एक दाट पटल पसरले आहे, यात शंका नाही.

आणि हे पटल कदापिही दूर होणार नाही.

**(आधारित)**








# लोहगड ते लंडन

— ह. सी. उसेंकर

**एखाद्या सरोवरातून कमळांचे लहानमोठे झुबके अचानक वर यावेत आणि अदृश्य व्हावेत असा तो 'प्रतिनिधी दर्शना'चा देखावा रम्य होता...**

लोकसंख्येच्या दृष्टीने फिनलँड हे राष्ट्र सुमार असले तरी आंतरराष्ट्रीय परिषदा भरवून त्या यशस्वी करण्यात फिनि लोकांचे राष्ट्रीय कर्तृत्व अजोड आहे म्हणूनच नेहेमी येथे आंतरराष्ट्रीय परिषदा भरत असतात.

चौदावी आंतरराष्ट्रीय समाजकल्याण परिषद फिनलँडची राजधानी हेल्सिंकी येथे दि. १८ ते २४ ऑगस्ट १९६८ पर्यंत आयोजित केली होती. ओटानिमी या हेल्सिंकीच्या उपवनरम्य उपनगरात परिषद भरली होती. ओटानिमी हेल्सिंकी शहरापासून सहा मैल दूर आहे. मुंबई नगरातून उपनगरात जाताना वांद्र्याची खाडी ओलांडावी लागते तेव्हा नाक दाबून घ्यावे लागते, ओटानिमिस जाताना फिनलँडची खटयाळ निळीधुंद खाडी पार करावी लागते. पण रस्त्यावर दोन्ही बाजूस फर, पाईन, बर्च वगैरे काश्मीरात दिसणाऱ्या वृक्षांच्या रांगा लागतात आणि नाक, कान, डोळे सर्व इंद्रियांनी हे लोभस सौंदर्य टिपावेसे वाटते.

सतरा ऑगस्टला सायंकाळी हेल्सिंकी विमानवेशीवर उतरलो तेव्हा प्रा. हेन्रीमास ह्या कॅलिफोर्निया युनिव्हर्सिटीतील समाजकल्याण विषयाच्या प्राध्यापकांची सहज गाठ पडली. मी हमाल पाहू लागलो. ते म्हणाले 'ख्राईस्टने आपला क्रूस खांद्यावर घेतला, आपण पण आपले सामान उचलले पाहिजे.' असे म्हणून त्यांनी मला सांगितले तुम्ही टॅक्सी पकडा मी दोघांचे सामान आणतो. फिनलँडचे भूमीवर पाऊल टाकताच स्वावलंबनाचा व आंतरराष्ट्रीय सहकार्याचा पहिला धडा मिळाला.

विमानतळापासून विमानवेशीपर्यंत जाताना वाटेत प्रा. मास यांनी हवापाण्याची इंग्रजी प्रस्तावना न करता सरळ मी परिषदेत वाचणाऱ्या पेपरबद्दल खोल चौकशी करण्यास सुरवात केली. लोकशाही–मूल्ये अबाधित ठेवायची असतील तर शांततामय, योजनाबद्ध उत्क्रांतीच्या–मार्गानेच समाजकल्याण साध्य करणे श्रेयस्कर या माझ्या मताशी ते सहमत झाले. भारतातील समाजकल्याण कार्याविषयी त्यांनी विचक्षण बुद्धीने चौकशी केली.

ओटानिमित ओटानिमी व दि पॉली ही दोन प्रसिद्ध हॉटेले अहेत. स्योमी भाषेत शब्दांच्या शेवटी 'ई' लावण्याची लकब दिसली. हॉटेलचे हॉटेली किंवा बूलेव्हार्दचे बूलेव्हार्दी ही रूपे नमुना म्हणून सांगता येतील. तसेच बारला बारी म्हणतात. ईकारान्त शब्द भाषेला जरूर मृदुता आणतात !

ओटानिमी हॉटेलच्या शेजारी विद्यार्थ्यांच्या वसतीगृहात तिसऱ्या मजल्यावर मला स्वतंत्र खोली मिळाली होती. दहा गुणिले बाराचा कमनीय कमरा होता तो ! प्रत्येक खोलीत उष्णता खेळवण्याची यंत्रणा होती. त्याच मजल्यावर सर्वांकरता एक फरीझ् होता. खोलीला पाच गुणिले पाच फुटाची काच बसवलेली प्रचंड भिंतवजा खिडकी होती. त्यातून दिसणारा देखावा मोठा लोभस होता. वाटले मी काश्मीरात आहे. समोर दल सरोवरासारखा सुंदर जलाशय. माझ्या खिडकीला लागून पाईन व फरची झाडे अगदी राधेच्या कानातील 'वारियाने कुंडल हाले'च्या डौलाने डुलत होती. त्यावरून खारी खेळकर उड्या मारीत; परंतु तलावाची संपूर्ण शोभा मात्र दिसत नव्हती. संशयकल्लोळातील कृत्तिकेप्रमाणे म्हणावेसे वाटले 'ही मेली झाडाची फांदी आडवी येते ना !'

दुसऱ्या दिवशी शेजारच्या दि पॉली हॉटेलात जाऊन परिषदेचे सर्व वाङ्मय हस्तगत केले. नुसते नाव सांगताच सर्व काम झाले. पैसे भरल्याची पावती दाखवा वगैरे घरगुती अविश्वास कुणीच दाखवला नाही. साऱ्या युरोपातच मला हा अनुभव आला. दुसरा मनुष्य हा सभ्य गृहस्थ आहे तो खोटं बोलणार नाही, गैरकायदेशीर काही करणार नाही या भूमिकेनेच ते लोकांना . .भारतीयांनासुद्धा वागवतात. कस्टम्सचा अधिकारीसुद्धा काही घोषित करायचे आहे का असे विचारतो. 'नाही' म्हटल्यावर कुणाचीही बॅग उघडल्याचे माझ्या पहाण्यात आले नाही. खरोखर वैयक्तिक नीतीमत्ता हाच राष्ट्रीय नीतीमत्तेचा पाया होय !

## अडीच हजार प्रतिनिधी

परिषदेला ६७ देशातून सुमारे अडीच हजार प्रतिनिधी आले होते. प्रतिनिधींच्या आद्याक्षरांप्रमाणे लावलेल्या देशवार छापील





अनुक्रमणिका

सूचीचे पुस्तक आम्हास देण्यात आले. त्यामुळे परस्पर परिचय करून घेणे सोपे झाले. सुमारे हजार प्रतिनिधी उत्तर अमेरिकेतून आले होते. जपानचे ६० प्रतिनिधी होते. चीन व रशियाचे कोणी नव्हते. भारताचे आम्ही दहा प्रतिनिधी होतो. मध्यवर्ती शासनाच्या समाज-कल्याण मंत्री महाशया श्रीमती फुलरेणू गुहा या आमच्या प्रतिनिधी संघाच्या नेत्या होत्या. त्यांनी समाजशास्त्रावर फ्रेंच भाषेत प्रबंध लिहून पॅरीस विद्यापीठाची डॉक्टरेट मिळवली आहे. समाज कल्याणा-बद्दल त्यांना खरी आंतरिक तळमळ आहे हे दिसून आले. निर-निराळ्या देशांचे १६ समाजकल्याण मंत्री परिषदेस आले होते. भारतीय प्रतिनिधी संघात ऐंशी वर्षाचे ऋषितुल्य प्रा. ए. आर. वाडिया होते. भारतीय समाजकल्याण समितीचे ते अध्यक्ष आहेत. त्यांचा उत्साह, ज्ञान व व्यासंग पाहून मला म. म. डॉ. पां. वा. काणे यांची आठवण झाली. त्यांना आम्ही महर्षी म्हणत असू. परिषद संपली की रोज सायंकाळी प्रा. वाडिया आमच्याबरोबर हेलसिंकी शहरात येत व आवडीने आईस्क्रीम खात. एके दिवशी मी त्यांना म्हटले मी आज शहरात येत नाही. मला पत्रे लिहायचीत. ते मला म्हणाले, रोजची पत्रे मी रोज रात्री लिहितो. मग रात्री बारा वाजले तरी हरकत नाही. जुन्या पिढीची ही शिस्तबद्ध कर्तव्यनिष्ठा खरोखर अनुकरणीय वाटते !

आमच्याबरोबर टाटा इन्स्टिट्यूटचे डॉ. गोरे होते. समाज-कल्याण विषयातील त्यांच्या व्यासंगाला आंतरराष्ट्रीय मान्यता मिळाली आहे. सबंध आशिया व आफ्रिका खंडातून त्यांचेच व्याख्यान पूर्ण परिषदेसमोर झाले. समाजकल्याण व मानवी हक्कां-संबंधी त्यांचे व्याख्यान फार परिणामकारक झाले.

परिषदेचे एक चिटणीस श्री. शरच्चंद्र गोखले ही एक व्यक्ती नसून ती आंतरराष्ट्रीय संस्थाच आहे. त्यांचे समर्पक आर्जवी वागणे, सुहास्य वदन, राजदूताप्रमाणे प्रसन्न संभाषण पद्धती, संघटनाचातुर्य यामुळे त्यांच्या मूळच्या रुबाबदार व्यक्तिमत्वाला उठाव येतो. जवळजवळ सगळ्या प्रतिनिधींना ते नावाने व वकुबाने ओळखतात. जागतिक समाजकल्याण चळवळीत त्यांनी स्वतःच्या गुणवत्तेने व कर्तृत्वाने स्वयंपूर्ण स्थान निर्माण केले आहे. समाजकल्याण विषयावर त्यांची अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. ते एक भारताचे खरे सुपुत्र आहेत. परिषदेपूर्वी काही महिने त्यांनी मला बोलावले व नेहमीच्या अनि-वार्य आर्जवी पद्धतीने सांगितले की हेलसिंकीच्या परिषदेसमोर सादर करायचा भारताचा राष्ट्रीय अहवाल तुम्ही लिहावा अशी भारतीय समाजकल्याण समितीची इच्छा आहे. त्या कामाच्या प्रचंडत्वाची कल्पना मला होती, पण गोखल्यांना नाही म्हणणे अशक्य !

मुंबईचे श्री. प्रभाशंकर भट्ट हे एक थोर समाजकल्याण कार्य-कर्तेही हजर होते. मद्रासच्या समाजसेविका पद्मभूषण श्रीमती मेरी क्लबवाला जाधव आल्या होत्या. पहिल्या भेटीतच त्या मला म्हणाल्या, 'तुम्ही संपादित केलेला भारताचा राष्ट्रीय अहवाल पहिल्या प्रतीचा आहे.'

अठरा ऑगस्टला दुपारी प्रादेशिक सभा झाल्या. आग्नेय आशिया व पश्चिम प्रशांत क्षेत्रातील भारत, दक्षिण कोरिया, सिलोन, मलेशिया, जपान, हाँगकाँग वगैरे देशांचे प्रतिनिधी एकत्र जमले. परिषदेतल्या कामकाजाच्या कार्यपद्धतीची माहिती देण्यात येऊन त्यावर चर्चा झाली.

दुपारचे भोजन म्हणजे उकडलेले बटाटे, दूध, सॅलड, ब्रेड घेतले. सगळे पदार्थ बिनफोडणीचे सपक होते. पण पंधरा रुपये द्यावे लागल्याने अन्नाला खमंग फोडणीची चव आली.

## सभागृहाचे दरवाजे बंद

परिषदेचा उद्घाटन समारंभ त्याच दिवशी सायंकाळी ७-३० वाजता होता. त्यासाठी क्रीडामंदिर मुळीच शृंगारले नव्हते. हे ३०० फूट गुणिले १५० फूटचे विस्तीर्ण सभागृह १९५२ साली जागतिक ऑलिंपिक मेळाव्याच्या प्रसंगी बांधले. आता या विस्तीर्ण सभागृहात विद्यार्थ्यांची संचलने व सांघिक व्यायाम होतात. भव्य व्यासपीठामागे हजर असलेल्या ६७ देशांचे रंगीबेरंगी राष्ट्रध्वज समान पातळीवर फडकत होते. जागतिक कीर्तीचे समाजकल्याण सिद्धांत शास्त्री व कार्यकर्ते व्यासपीठावर विराजले होते. हेलसिंकीच्या पोलीस वाद्यवृंदाने सुरवातीला बँडवादन करून फिनी संगीत ऐकवले. तो वाद्यवृंद व्यासपीठावरच बसला होता. नमनाचा वाजा वाजवल्यावर ते शिस्तीने उठून गेले.

परिषदेचा उद्घाटन समारंभ अगदी व्यावहारिक भूमिकेवरून उरकला. सुरवातीला संदेशवाचक हा हौशी वक्ता नाही की अखेर आभारांचा शिळा उपचार नाही, किंवा हारतुऱ्याची नाजूक लुडबुड नाही. वक्ते इंग्रजी किंवा फ्रेंचमध्ये बोलत. प्रत्येकाच्या खुर्ची-समोर इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, फिनिश, स्पॅनिश, इटालियन वगैरे युरोपियन भाषेतून वक्त्यांची भाषणे ऐकण्याची सोय होती. प्रत्येक प्रतिनिधीला एक उपकर्ण दिला होता. त्याची किंमत सुमारे ६० रुपये होती. त्या कर्ण-उपकर्णाच्या साहाय्याने हव्या त्या भाषेतील भाषांतर आम्हाला तत्काळ ऐकू येई. कुतुहलाने मी सर्व भाषांचा भाषांतरित रस चाखला. हे भाषा कॉकटेल बुद्धीला उत्तेजित करणारे होते. मला वाटले या सर्व भाषा आपणाला का येऊ नयेत ? तिकडे 'वक्ता' बोलत असता जणू टाईपरायटरच्या तत्परतेने चलाख भाषांतरकार तुमच्या कानावर त्या त्या भाषेतील भाषांतर बिनचूक उठवीत ! हा अनुभव मला अपूर्व होता. आंतरराष्ट्रीय परिषदेत विज्ञानाच्या मदतीने भाषेच्या अडचणीवर केलेली मात होती ती ! भाषा महत्त्वाची नाही, विचार महत्त्वाचा असतो ! ही 'विविध भारती' वैचारिक होती.

परिषद ठीक साडेसातच्या ठोक्यास सुरू झाली व सभागृहाचे दरवाजे बंद करण्यात आले. नंतर कुणाला प्रवेश नाही. हा आंतर-राष्ट्रीय वक्तशीरपणा व कडक शिस्त आम्हांला अपरिचितच होती. रात्री नऊला उद्घाटन समारंभ संपला. जाताना प्रत्येक प्रतिनिधीने आपला उपकर्ण न विसरता हॉलमधील टेबलावर टाकला व दि








पॉली हॉटेलमधील हॉलमध्ये एस्पोर या स्थानिक नगरपालिकेने आयोजित केलेल्या स्वागत समारंभात आम्ही सामील झालो. फक्त फळांचा रस देण्यात येऊन उभ्या उभ्याच हा समारंभ फलद्रुप करण्यात आला.

दुसऱ्या दिवशी सकाळी दहा वाजता त्याच क्रीडामंदीरात आंतरराष्ट्रीय हजेरीचा भव्य आगळा समारंभ झाला. थोडा पाऊस पडल्यामुळे हवा चांगली गार व उत्तेजक होती. हॉलमध्ये पोषाखाचें जंगी प्रदर्शन भरल्यासारखे वाटले. रंगीबेरंगी लेस लावलेले सैलसर शर्ट घातलेले तरतरीत फिलीपाईन्सचे प्रतिनिधी हे एक आकर्षणच होते. शेकडो अमेरिकन स्मितमुखी प्रौढा उत्साहाने वावरत होत्या. गोरेपान, कृत्रिम हास्याचा मुखवेष ल्यालेले काही आशियाई प्रतिनिधी पुष्कळ होते. शामल काळे आफ्रिकी होते. फरच्या काळ्या टोप्या घातलेले इंडोनेशियन प्रतिनिधी चटकन ओळखू येत. झांबियाचे उंच प्रतिनिधी त्यांच्या रोचक रंगीत पोषाखामुळे उठून दिसत होते. सर्वत्र उत्साहाचें वातावरण होते. मानवाच्या सामाजिक विकासासाठी अनक देशांचे प्रतिनिधी जगाच्या उत्तर टोकाला जमले होते. ही घटना जगाच्या भवितव्याच्या दृष्टीने खरोखर आशादायक होती. निरनिराळ्या देशांचे प्रतिनिधी गटगटाने बसले होते. प्रथम यजमान देश फिनलँडचे नाव पुकारण्यात आले. फिनलँडचे प्रतिनिधी उठून उभे राहिले. सर्वांनी टाळ्या वाजवून त्यांना मानवंदना दिली. नंतर अकारविल्हेप्रमाणे उपस्थित असलेल्या प्रत्येक देशाचे नाव उच्चारण्यात आले व त्या त्या देशाचे प्रतिनिधी उभे राहून हात उंचावीत व इतर देशीय प्रतिनिधी त्यांना 'यथेच्छ' टाळ्या वाजवून मानवंदना देत. 'यथेच्छ' म्हणण्याचे कारण प्रत्येक राष्ट्राला टाळ्यांचे निरनिराळे माप मिळे. भारत, जपानला चांगल्या टाळ्या मिळाल्या. पण इंडोनेशियाला फारच कमी. अमेरिकेला खूपच मिळाल्या. सगळ्यात उत्स्फूर्त व सर्वदूर टाळ्या चेकोस्लोव्हाकिया व युगोस्लाव्हिया या देशांना मिळाल्या. नाट्य समीक्षकांच्या भाषेत म्हणजे अगदी कडकडून टाळी पडली ! एखाद्या देशाचे नाव घेताच त्याचे प्रतिनिधी एकजुटीने उभे राहात. एखाद्या सरोवरातून कमळांचे लहान मोठे झुबके अचानक वर यावेत व अदृश्य व्हावेत असा तो नयनरम्य देखावा होता. यात आणखी एक गंमत होती. विनोदी चित्रपटांच्या टायटल्स दाखवताना कधी कधी अक्षरे अनपेक्षित ठिकाणी प्रकट होतात तसाच काहीसा हा प्रकार वाटला. कारण कुठला देश त्या प्रचंड आंतरराष्ट्रीय मानव सागरात कुठे बसला असेल त्याप्रमाणे क्रीडामंदीरात त्या देशाचा उठाव होई. इस्त्रायलसारख्या छोट्या राष्ट्राचे २० प्रतिनिधी होते पण भारताचे मात्र जेमतेम दहा. अमेरिकेच्या संयुक्त राष्ट्राचे नाव काढताच हजारांचा प्रचंड प्रतिनिधी समूह हजेरी देण्यासाठी हसतमुखाने उभा राहिला व प्रचंड टाळ्यांनी त्यांचे स्वागत झाले. हा समारंभ खरोखर शब्दशः अपूर्व होता. 'अहो, तुम्ही कोपऱ्यातले जरा उभे रहा की ! किंवा 'तुम्ही पलीकडचे बसून घ्या की हो' वगैरे सूचना कोणालाही सांगायची पाळी आली नाही. हा आंतरराष्ट्रीय परस्पर परिचय समारंभ किती शिस्तबद्धतेने व शीघ्र पार पडला !



'क्लीन बोल्ड'—खेळ खलास...

## नावात उरलेले सुवर्ण

यानंतर परिषदेच्या सहा विभागांचे कार्य सुरू झाले. 'मानवी हक्क व समाजकल्याण यांची तौलनिक मूल्ये' हा पहिल्या विभागाचा चर्चाविषय होता. माझा पेपर त्या विभागात होता. या विभागात सत्तावीस देशांचे प्रत्येकी एक असे प्रतिनिधी होते. रेव्हरंड सिम्पसन हे इंग्लिश गृहस्थ विभागीय अध्यक्ष होते. हे मध्यम बांध्याचे लालबुंद गृहस्थ होते. अत्यंत तल्लख बुद्धी, विनोदी वृत्ती, हंसतमुख, ज्ञानी असे हे अध्यक्ष होते. कुठल्याही मुद्यावरील गरम चर्चा ते थंड डोक्याने ऐकून घेत व त्यातील संघर्षाच्या गाभ्यावर बोट ठेवीत. त्यांच्या चिटणीस म्हणून सुवर्णा काननगारा या लंकेच्या विदुषी होत्या. लंकेत सोन्याच्या विटा आता फक्त 'विट्' करण्यापुरत्याच असल्या तरी सोनरी नावे धारण करणाऱ्या ललना अजूनही आहेत हे ऐकून लंकेत नावापुरते तरी सोने शिल्लक आहे हे पटले. या विदुषी चर्चा चालू असताना भराभर टिपणे घेत, पण त्यांना बोलताना मात्र कुणी ऐकल्याचे एकिवात नाही. कुणी काही विचारल्यास त्या फक्त माफक स्मित करीत व आवश्यक कागदपत्र पृच्छकासमोर टाकीत. रोज सुमारे ४। तासप्रमाणे पाच दिवस ही चर्चा चालली. भारतातर्फे मी एकटाच प्रतिनिधी या विभागात होतो.

## आयत्या वेळची धांदल

बुधवार ता. २१ ऑगस्टला 'मानवी-हक्कांच्या अंमलबजावणीसाठी राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय विधीव्यवस्था' या विषयावर आमसभेपुढे सेमीनार होता. त्याला सबंध आशिया व आफ्रिका या खंडातर्फे कोणी प्रतिनिधी नव्हता. तेव्हा मंगळवारी संध्याकाळी परिषदेने मला तत्काळ एक वर्किंग पेपर तयार करण्यास सांगितले. परिषदेच्या इंग्रजी व फ्रेंच दैनिक बुलेटिनमध्ये मी भाग घेणार म्हणून ह. सी. उसकर (भारत) असे नाव छापले होते. तेव्हा 'भयात् रणात उपरतंमंस्य' हा प्रतिष्ठेचा प्रश्न आला. आता आली का

अनुक्रमणिका

पंचाईत ! उद्या सकाळी ११ वाजता सेमीनार संदर्भग्रंथ तर नव्हतेच, भारताच्या घटनेची प्रतही उपलब्ध नव्हती. तेव्हा अगतिक होऊन खोलीवर जाऊन विचाराधीन झालो व त्यातच निद्राधीनही; कारण सत्त्वपरीक्षाच होती ती ! पहाटे तीनला अचानक जाग व स्फूर्ती आली. पेन घेऊन कागदावर सकाळी ७ पर्यंत पेपर लिहिला. विशेषत: समाजकल्याणवरील भारतीय घटनेतील तरतुदी व भारतातील समाजकल्याणविषयक अधिनियम यावर प्रकाश टाकला. लगेच पेपर टाईप करून घेतला. सकाळी ११ वाजता सेमीनारमध्ये म्हणून दाखवला, कारण ताजा असल्याने वाचण्याची जरूरी नव्हती. माझे भाषण सर्वांना पसंत पडले असे वाटले. माझ्या-बरोबर सेमीनारमध्ये अमेरिकन, जर्मन व फिनी प्रोफेसरांनी भाग घेतला होता. अध्यक्ष अमेरिकन डीन केंडालस्पर्गर हे होते. ते इतके उत्साही होते की खुर्ची असूनही सर्व वेळ ते अध्यक्षस्थानी उभेच होते. त्यांनी माझा खास उल्लेख केला. प्रश्नोत्तरे झाली त्यात सर्वात अधिक प्रश्नांना मलाच तोंड म्हणजे तोंडी उत्तरे द्यावी लागली. भारतात इंग्रजांनीच प्रथम समाजकल्याणाची कल्पना आणली हे खरे का असा एक प्रश्न विचारण्यात आला. मी उत्तर दिले की समाजकल्याणाची मूलतत्त्वे भारतीय संस्कृतीचा आज हजारो वर्षे अविभाज्य भाग होऊन राहिली आहेत. 'सर्वेऽपि सुखिन: सन्तु । सर्वे सन्तु निरामया: । सव भद्राणि पश्यन्तु । न कश्चित् दु:खमाप्नुयात् ।। या श्लोकात जनतेचे सुख, स्वास्थ्य, आरोग्य, कल्याण ह्या गोष्टी सांगितल्या आहेत. एका अमेरिकन विदुषीने मला विचारले, 'भारतात विशषत: मुबईला यायचे अहे, पण तिथ दिवसासुद्धा रस्त्यावर साप फिरतात म्हणे म्हणून मन घत नाही.' त्यांना मी सांगितले की साप पहाण्यासाठी मुंबईला म्युझियममध्ये जावे लागते आणि ते सापही मेलेले आहेत. तेव्हा त्यांची भीती नको. मेलेल्याला मारण्यात काय अर्थ अहे ?

सेमीनार संपल्यावर अनेक प्रतिनिधींनी उत्तम इंग्रजी वक्तृत्व, विषय विवेचन व भारताची बाजू उत्तम रीतीने मांडली याबद्दल माझे सहर्ष अभिनंदन केले. किंबहुना ज्यांची मातृभाषा इंग्रजी आहे असे लोक म्हणजे ब्रिटिश व अमेरिकन सोडले तर भारतीयांइतके अस्खलित इंग्रजी आत्मविश्वासाने बोलणारे मला त्या परिषदेत तरी फारसे कुणी आढळले नाहीत.

शनिवार दि. २४ ऑगस्ट हा परिषदेचा शेवटचा दिवस. सकाळी नऊ वाजता क्रीडा हॉलमध्ये आमसभा भरली. सहा कमिशनच्या अध्यक्षांनी आपापले रिपोर्ट वाचून दाखवले व त्यावर मोजके मुद्देसूद भाष्य केले. कार्यक्रम समितीचे प्रमुख श्री. मेहली यांनी फ्रेंचमध्ये विचारप्रवर्तक भाष्य-भाषण केले. त्यानंतर थोड्याच वेळात समारोप अधिवेशन झाले. आंतरराष्ट्रीय समाजकल्याण परिषदेचे अध्यक्ष प्रो. प्युसिज यांनी सुंदर समारोप केला. हे युगोस्लाव्ह आहेत. त्यांना भगवद् गीतेची आठवण झाली. ते म्हणाले मला आता विचारण्यात आले की ही परिषद यशस्वी झाली असे तुम्हाला वाटते का ? मी त्यांना भगवद् गीतेच्या शब्दात सांगेन की अशा परिषदांकडे आपण सुख-दु:ख, लाभ-तोटा हे सारखेच आहेत अशा दार्शनिक समचित्त-त्वाच्या भावनेनेच पाहिले पाहिजे, तरच आपल्या हातून भरीव कामगिरी होऊ शकेल.' अशा रीतीने ही चौदावी आंतरराष्ट्रीय समाजकल्याण परिषद संपली व सर्वांस जाण्याचे वेध लागले.

[क्रमश:]





अनुक्रमणिका

# काका कुबेर

## "....एक दिवस मेला सुटीचा मिळतो तर नुसतं घर डोक्यावर घेतात....पोरं बरी तुमच्यापेक्षा....माझं ऐकतात तरी...."

तु. मो. साळी




रविवारचा दिवस, दुपारची वेळ. जरा वामकुक्षी करू म्हटलं. नुकताच डोळा लागला; तितक्यात ठण्दिशी दारावरची कडी वाजली.

"आहेत का घरात ?"

"आहेत, कोण हो ?"

"मी !"

"काय काम आहे ?"

"पैसे देईन म्हणतो तुम्हाला !"

"मला ?"

"हो. .हो. तुम्हाला. !"

"मला नसेल हो !"

"हो. हो तुम्हालाच !

आता मात्र दरवाजा उघडणं भाग पडलं. निद्रेचा मोह बाजूला सारून, कपड ठाकठीक करून दरवाजा उघडला. एक अपरिचित माणूस उभा होता.

"या. .या.. !"

"काय चालले आहे ?

"काही नाही, सहज मासिक बघत होतो !"

"बघा. .बघा. !"

आता घरी अपरिचित माणूस आला, नुसता आला नाही ! पैसे द्यायला आला आहे ! मासिक बघायला मन लागेल काय ? अहो, मासिक काय कधीही वाचता येईल ! पण, असा माणूस कधी भेटेल काय ?

"आपण कोठून आलात ?" मी नम्रतेने विचारले.

त्याचे उत्तर येईपर्यंत घरातून चहा आलाच.

"घ्या काका ! चहा घ्या !"

"अरे चहा-बिहा आम्ही घेत नसते. तुम्ही म्हणते तर आण जरासा !"

चहा घेऊन झाल्यावर काका मोठ्या आत्मीयतेने म्हणाला—"तर मी तुला काय म्हणत होतो. .तुला किती हजार पाहिजेत बोल. मजजवळ (टोपी हातात घेऊन) असा पैसा आहे. गव्हर्मेंटची पॉलीसी बदलल्यामुळे सगळा काढून टाकणार आता. जो भेटला. .त्याला म्हटलं घ्या. घ्या. खा. .प्या. . .मजा करा. सगळे संतोसले बघा !"

"संतोपणारच !" मी स्तुती करण्यासाठी म्हणालो. परंतु या माणसानं आपल्याला सोडून इतरांना पैसे देऊन टाकावे याबद्दल वाईट वाटलं. "म्हटलं, पैसा द्यायचाच आहे तर तुम्हालाही थोडा-बहुत देऊन टाकावा !"

इतक्या लोकांना दे-दे केल्यावर माझ्या वाट्याला काय येणार ? हे शब्द अगदी ओठावर आले होते ! उदास होऊन म्हटलं,

"तुम्हालाही असू द्या हो काका थोडासा, सर्व देऊन टाकल्यावर तुम्ही कोणाच्या तोंडाकडे बघणार ?"

"अरे, तू त्याची काळजी करू नको. . . काय ? आपल्याजवळ पैशाला कमी नाही. !"

असे म्हणून त्याने बिडी शिलगावली व माचिस खिशात ठेवली.

"मग तुला नको तर. ? मी मोठ्या आशेने इतक्या दूर आलो होतो, पण तू मोठा सच्चा माणूस निघाला. . . !" त्याने नाइलाजाने म्हटले.

"तसं नाही. !"

"अशी माणसं पाहिजेत. एक पैसा कुणाचा घ्यायला तयार नाहीत. तुमच्या सारख्या सच्चा माणसांवर दुनिया टिकून राहिली आहे !"



अनुक्रमणिका

मी खिन्नतेने हसलो. हाती येणारा पैसा केवळ शब्दांचे अवडंबर माजून जाणार याचे वाईट वाटले.

"कसेही असले तरी आम्ही संसारी माणसं हो काका ! आता तुम्ही घरी आलात, पैसे देतो बोललात आता मी नाही म्हणायचं बरं दिसतं का ? लोक काय म्हणतील ?

"अरे. लोक काही पण म्हणू दे. लोकांची काय बात ?

हा मनुष्य काही पैसा देणार नाही बहुतेक. नुसतं तोंडाला पाणी सोडायला आलेला दिसतो.

"चला, तुम्हाला काही काम नसेल तर गावात भटकून येऊ !

"चला–! मी लगेच तयार झालो.

निघाल्यावरोबर प्रथमच आईसक्रीम तयार ठेवणारं दुकान लागलं. आईसक्रीम खाऊन झाल्यावर काकांनी एकदम पाचाची नोट दुकानदाराच्या हवाली केली. दुकान-दारानं बाकीचे पैसे देण्यासाठी पुढे केले. पण, काकाने घेतले नाहीत व मलाही घेऊ दिले नाहीत.

मनात विचार केला. काय पैसा आहे माणसाजवळ ..! आणि आपण पावली दिल्यावर बारा पैशांऐवजी तेरा पैसे कां दिले नाहीत ? म्हणून भांडत राहतो. काय जिणं आहे ! छी: छी: ! आता हा काका बरा मिळाला म्हणायचा, हा काका माझ्या घरी पाठवून देवानं बरीच मेहेरबानी केली म्हणायची. . .हजार-दोन हजार तर नुसते पोरासोरांच्या हाती खाऊ म्हणून ठेवून जाईल. पुढची बात वेगळीच !

काय एखाद्यावर प्रसंग येतो बघा, ह्या माणसाला पैसे ठेवायला जागा नाही ! आणि माझ्यासारख्याजवळ विष खायला पैसा नाही !

"काका, आता आपण कुठे जायचं ? मी विचारले.

"आधी दाढी करून टाकू ये !"

आम्ही सलूनात शिरलो. काका दाढी करायला बसल्यावर मी विचार केला, आपणही उरकून टाकू, एवीतेवी काका पैसेच देत सुटला आहे. . .

दोघांच्या दाढीसाठी काकाने दहा रुप-याची नोट सलूनवाल्याच्या अंगावर भिरकावली. काका बाहेर निघाल्यावर मी सलूनवाल्याकडून पैसे घेऊन टाकले. काकाच्या ध्यानात आल्यावर काका म्हणतो, "असा पैशांचा लोभ काय करून राहिला आहेस ? खाऊ दे गरीबाला !"

"खरं सांगू काका !"

"काय खरं सांगतो ?"

"मी त्याच्यापेक्षाही गरीब आहे !"

"अरे, सोड ही बात, पैशांनी बुजवून टाकीन तुला !"

"खरं म्हणता काका ?"

"हो. . .हो अरे आपल्याजवळ काय कमी आहे ?"

मी भारावून म्हणालो–

"काका"

"काय ?

"मला पैशांनी बुजाल तर बरेच होईल पण एक करा, घरात बुजा, रस्त्यावर नको. . . लोक कसे आहेत. . ? मला वाचवायचं निमित्त करून, खिसे भरून नेतील !

"नाही रे बाबा तुला पैशांनी बुजून मला काय मिळणार आहे. ? उगाच कोणाचं वाईट कशाला करा. काय ?" मी आग्रहाने म्हणालो–

"यात काय वाईट आहे काका ? मला तुम्ही खुशाल पैशानं बुजून टाका. मी मेलो तरी तोंडातून ब्र काढणार नाही. लिहून देतो पाहिजे तर. कधी तरी मरायचेच आहे ना ? मग डॉक्टरचे बिल वाढवून मरण्यापेक्षा पैशांच्या ढिगाऱ्या-खाली मेलेलं काय वाईट ? नाही तरी लोक पैशासाठीच मरतात ना ? आणि खरं पाहता पैशाखाली सापडलेल्या माणसाचा जीव जाईलच कसा ? पैशासाठी तर उलट माणसाचा जीव अडकतो !"

"बरं तुला आता काही कपडेलत्ते पाहिजेत का बोल !"

**बीमार !**

हातांतून 'बॅट'च निसटली !





अनुक्रमणिका

काकाच्या या बोलण्यावर मी होकारार्थी मानसुद्धा न करता समोर असलेल्या कापड दुकानात शिरलो. हो, काका बदलला तर घेता काय ?

भाव-राव न करता, नगच्या नग उचलले.

"अरे.. इतका काय कामाचा ? काका तुच्छतेने म्हणाला.

"असू द्या हो काका. तुम्ही तरी इतक्या पैशांचे काय करणार ? याला-त्याला वाटूनच टाकणार ना ?

काकांनी कापडवाल्याच्या अंगावर नोटांचं पुडकं भिरकावलं, ते मी अलगद् टिपलं व बिल पाहून पैसे दिले. बाकीचे मजजवळ ठेवले. मनात म्हटलं सगळं दुकानच घेऊन टाकायला पाहिजे होतं !

"काका, तुम्ही खरंच इतके श्रीमंत आहात काय हो ?"

"अरे बाबा पैसे ठेवायला जागा नाही ते बोंबलून राहिलो ते उगाच का ?"

"माझ्या घरी ठेवा ना काका, आमच्या माळ्यावर खूप जागा आहे. आमच्या घरी कोण बघायला पण यणार नाही." पण काकांनी तिकडे लक्ष दिलं नाही.

हा काका आपल्या माळ्यावर पैसे ठेवून जाईल तर काय बहार होईल ! बघू, बघू आणि एकाद्या दिवशी सू-बाल्या करू ! ह्या मनोराज्यात असल्यामुळे मला एकदम ठोकर बसली.

काका उपदेश करू लागला–

"अरे बाबा पैशाच्या लोभात पडलं की अशा ठोकरा बसतात !"

"लोभ हा वाईटच हो काका !"

"थांब आपण जरा बुटाला पॉलिश करून घेऊ !"

"चालेल" मी आनंदाने म्हणालो.

मी नये दहा पैसे वर काढून ठेवले. म्हटलं बुटाचं पॉलिश झाल्यावर काका पाच-दहाची नोट तरी भिरकावणार, असू द्यावे पैसे जवळ, पॉलिशवाला इतकी मोड कोठून देणार ?

"काका तुम्ही रोज इथेच येत जा, आपण दोघे मिळून मार्केट करत जाऊ, मी रजा घेऊन टाकतो पाहिजेल तर ?"

"अरे. .बाबा तू पैशांचा लोभ करू नको. .हे बघ !"

काका मला कानाशी येऊन सांगू लागला–

"मी काही खरोखरचा तुझ्याबरोबर पैसे वाटत नाही आहे !"

"मग ?"

"मी तुझ्या स्वप्नात आलो आहे. जागा झालास की पैसे पण गेले आणि काका पण गेला. . !"

"असू द्या हो काका, स्वप्न तर स्वप्न ! आमच्या सारख्या गरीबाला इतका पैसा स्वप्नातसुद्धा दिसत नाही बघा !"

"तुला एक बूट घेऊन देऊ का बऱ्यापैकी !" काकाने विचारले.

"गमबुट पण घेऊन द्या काका पावसाळ्याचे –!" मी अगदी लहान मुलासारखा हट्ट धरून म्हटले.

"पण, हे स्वप्न आहे हं, ध्यानात असू दे !"

"स्वप्न तर स्वप्न मग काय करता ?"

दुकानात जाऊन मी जाहिरातीत दिसणाऱ्या रुबाबदार माणसासारखे बूट घतले. काकांनी शंभर रुपयाची नोट उडवली. काका साक्षात् पसे उडवीत होता ! माल घऊन राहिलेले पैसे मी वेचत होतो !

बाहेर आल्यावर मी म्हटले–

"काका तुम्ही काय श्रीमंत आहात हो। तुम्ही परत न घतलेले पसे आणि माझा संबंध महिन्याचा महागाई भत्यासह पगार एक आहेत बघा ! बरं आता मला आणखी काय घऊन देता म्हणता ?"

"तू काही पण घे. पण, हे स्वप्न आहे राजा !"

"अहो काका गेल्या वर्षी असंच घडलं बघा. इतरांचा पगार वाढला आणि माझा कमी होऊन गेला हो ! वाटलं हे स्वप्न असेल, पण हकीगत खरी निघाली. त्या दिवसापासून केस पांढरे होऊ लागलेत बघा.."

"ह्या काळ्या पैशामुळे माझेही सगळे केस पांढरे होऊन गेलेत बघ !"

"यावर एक उपाय आहे काका !"

"कोणता ?" काकाने विचारले.

"पंधरा-वीस हजाराचा मला एक बिझिनस काढून द्या, तेवढाच तुमचा भार हलका होईल ! नोकरीत काही राम नाही बघा !"

"अरे पंधरा-वीस हजार तर माझी पोरं नुसते ट्रीपला नेतात !"

"अस्सं ? इतके नका देत जाऊ हो काका. !"

"अरे मग इतक्या पैशाचं करायचं काय ?" काका हताशपणे बोलला.

आम्ही घरी आलो. सामान-सुमान घरात ठेवलं ! न सांगताच चहा आला. पोरंही अगदी देवासारखी गप बसली होती. चहा पिऊन झाल्यावर काका म्हणाला–

"बघू तुझा माळा, आता तू म्हणतोच आहे तर ठेव ही बॅग !"

मी आतील खोलीत गेलो व सरसर माळ्यावरची जागा नीट करून म्हटले–

"हाँ काका आणा आता बॅग !"

पण तिथे काका होताच कुठे ? घरातली पोरं गोंगाट करून "तिला" सांगत होती–

"आई ! बाबा बघ. !"

बाबा. बाबा. करून पोरं टाळ्या पिटू लागली !

"अग बाई अहो माळ्यावर कशाला धडपडताय् दुपारच्या वेळी. .?"

"गप बस ग. ! मी तिला उगाच दटावले.

"एक दिवस मेला सुटीचा मिळतो तर नुसतं घर डोक्यावर घेतात. . पोरं बरी तुमच्यापेक्षा. ऐकतात तरी. !

मुकाट्यानं खाली उतरलो. मग काय करता ?

● ● ●








# आयुर्विम्यातील तुमच्या बचतीने पुसद शहराला मुबलक पाणी मिळवून दिले.





पुसद हे २०-२२ हजार लोकवस्तीचं एक छोटं शहर! लोकांच्या सुख-सोयींसाठी झटणाऱ्या तेथील नगरपालिकेला गेली कित्येक वर्षे एक मोठी समस्या भेडसावीत होती. आणि ती समस्या होती पाण्याची! दूरवर जाऊन नदीवरून किंवा विहीरीवरून पाणी आणण्याची यातायात त्या शहरातल्या स्त्रियांना करावी लागे. पण आज ही दगदग थांबली आहे. शहरात नळ आले आहेत. घरोघरी मुबलक पाणी मिळूं लागले आहे.

पाणी पुरवठ्याच्या या योजनेखाली पुसद नगरपालिकेकडे पुरेसा पैसा नव्हता. परंतु आयुर्विमा कॉर्पोरेशनने तिला कर्जरूपाने मदत केली. अशा किंवा याहून मोठ्या अशा कितीतरी कल्याणकारी योजनांना आयुर्विमा कॉर्पोरेशन हातभार लावते. तुम्ही आयुर्विम्याचे जे हप्ते भरता त्या रकमेतूनच या अशा योजनांसाठी अगदी माफक अटींवर कॉर्पोरेशन कर्ज देत असते. अशा तऱ्हेने आयुर्विम्यातील तुमचा पैसा देशउभारणीच्या कार्यात महत्वपूर्ण कामगिरी बजावतोच; शिवाय तुमची जोखीम बाळगण्याचेहि तो कार्य करीत असतो.



## लाइफ इन्शुअरन्स कॉर्पोरेशन ऑफ इंडिया

PRATIBHA 697 MAR







# राजकारणाचे पंचप्राण !

**राजकारणातील कटबाजी नि गटबाजी साधण्यासाठी राजधानीत स्त्रियांचा उपयोग जास्त प्रमाणावर होत आहे याबद्दल आर्य चाणक्याला किती आनंद होत असेल.... दिवाळी अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखाचा हा उत्तरार्ध ....**

— दादूमिया




समाजवादी हिंदूसभा वा कॉंग्रेसमधल्या कित्येक दुर्दैवी जीवांच्या स्त्रीविषयक ओढीची तरफदारी करणारे श्रद्धाळू भगतसुद्धा माझ्या चांगले माहितीतले आहेत. एक हिंदुत्वनिष्ठ अभिमानाने मला म्हणाले, "त्या महार स्त्रीच्या अंगी दिव्यत्व पाहिल्यामुळेच आमच्या x x x नी तिला आपला दिव्यत्वाचा अंश अर्पण केला." धन्य ते दिव्यत्व ! धन्य ते भगतगण !!

"यद्यपि सत्यं लोकविरुद्धं नादरणीयं नाचरणीयम् ॥" हे सूत्र सतत डोळ्यासमोर ठेवणारे काही महाभाग माझ्या ओळखीचे आहेत. एक कॉंग्रेस पदाधिकारी सध्याच्या कायद्यानुसार दुसरे लग्न करता येत नाही म्हणून निराश झाले नाहीत. त्यांची दुसरी स्त्री त्यांच्याच घरात राहते, खाते, पिते व वैद्यकीय व्यवसाय करते. ती लोकांना उपयोगी पडत असल्याकारणाने लोकही तिला उदार अंतःकरणाने क्षमा करतात. 'पब्लीक मेमरी इज् व्हेरी शॉर्ट्' हे सूत्र या कॉंग्रेसच्या पदाधिकाऱ्यांनी मला सांगितले. एका निवडणुकीत त्यांना या प्रकरणामुळे विरोधी प्रचाराने त्रास झाला खरा; पण पुढील निवडणुकीत ह्या लेडी डॉक्टरांनी वाचविलेल्या अनेक स्त्रियांचे नवरे त्यांना चालते बोलते प्रचारक मिळाले ! त्यांच्यासारखेच दुसरे एक एस. एस. पी.चे पदाधिकारी माझ्या ओळखीचे आहेत. त्यांनी लोकांविरुद्ध जाऊन दुसरे लग्न गुप्तपणे केले. पुढे दुसऱ्या स्त्रीचा ते राजरोसपणे 'ह्या आमच्या मिसेस्' असे म्हणून लोकांशी परिचय करून देत ! आता त्यांचे प्रकरण जुने झाले आहे. 'निदान मुसलमान तर झाला नाही हे काय कमी आहे ?' असे म्हणून त्यांना एके काळी प्रकट विरोध करणाऱ्या कर्मठ मंडळींनी नुकत्या झालेल्या निवडणुकीत त्यांना पाठिंबा दिला होता.

प्रेमातही राजकारण खेळणारी काही राजकारणी मंडळी मला ठाऊक आहेत. ह्या सर्वांचा गुरु कच ! असुरांच्या शुक्राचार्य ह्या गुरूकडून संजीवनी विद्या हस्तगत करण्यासाठी या पठ्ठ्याने देवयानीस प्रेमात पाडले, उल्लू बनविले व शेवटी मी तुझा 'सहोदर' याने 'बंधू' असे म्हणून पुन्हा देवांच्या छावणीत संजीवनी विद्या प्राप्त करून तो माघारी फिरला ! असेच महान तत्त्वज्ञान सुप्रसिद्ध राणी क्लिओपात्रा हिने आपल्या धर्मगुरूंच्या गळी उतरविले ! क्लिओपात्रा सीझरसाठी वेडी झाली होती. पण सीझरचे रोममध्ये लग्न झाले होते. त्यास एक मुलगाही होता. त्यावेळच्या नियमांप्रमाणे सीझरला क्लिओपात्राशी लग्न करता येईना ! म्हणून तिने एक नवीन तत्त्वज्ञान शोधून काढले ! तिने जाहीर केले की ज्युलीयस सीझर मानव नसून देव आहे. अॅमॉन म्हणजे सूर्यदेवाचा अवतार आहे ! देवाचा अवतार म्हटला की सारे गुन्हे माफ.

## सर्वात हुषार पुरुष

टेंपररी भानगड करून पुन्हा नामानिराळे व स्वच्छ राहणारे राजकारणी पुरुष सर्वात हुषार होत. 'अजिबात प्रेम (म्हणजे लफडे !) न करण्यापेक्षा एकदा प्रेमाचा अनुभव घेणे फार बरे', अशा अर्थाचे स्पष्टीकरण एका सुप्रसिद्ध संयुक्त महाराष्ट्रवादी पुढाऱ्याने मला सांगितले. त्यांचे म्हणणे, 'लफडी करायला दम लागतो त्याच्या दुप्पट दम व हिंमत ती निस्तरायला लागतो.' अर्जुनाने अशा भानगडी जागोजागी केलेल्या आपल्याला वाचावयास सापडतात. सुभद्रेपासून ते थेट नागकन्या उलुपी व अप्सरा उर्वशी यांच्याबरोबर या स्वारीने मौज मारली. त्याचा बंधू भीमराज. लक्ष्मणाने शूर्पणखेचे नाक व कान कापले, भीमाने ती चूक केली नाही म्हणून कुरुक्षेत्री युद्धात घटोत्कचाचे अद्भुत शौर्य सर्वांना पहावयास मिळाले. आजच्या वोइंगच्या जमान्यात भारतीय भीमार्जुन आंतरराष्ट्रीय भानगडी करताना आढळतात. कोण मंत्री सारखा परदेशाच्या वाऱ्या करतो हे नीट 'न्याहाळले' तर त्या वाऱ्या 'कोणासाठी' व 'कशासाठी' होत

असतात ते ध्यानात यावयास वेळ लागणार नाही. पोलीस-शास्त्राप्रमाणे अट्टल दरोडेखोर सारे धोके पत्करूनही त्याच्या प्रियेच्या घरी भेट घ्यावयास येतोच येतो. जॉनसनने राजकारणी पुरुषास प्रथम श्रणीचे बदमाष का म्हटले ते सूज्ञांस सांगणे नलगे. माझ्या एका मित्रास विशिष्ट इंडस्ट्रीचा परवाना पाहिजे होता. त्याने त्या मंत्र्याचा नीट 'अभ्यास' केला व पॅरीस येथे मुक्काम ठोकून मंत्र्याच्या फ्रेंच अंगवस्त्राशी सूत जमवून तीस मोठ्या रकमेची लाच देऊन पाहिजे ते लायसेन्स मिळविले ! अशाच रीतीने स्त्रीद्वारे राजनैतिक संबंध जोडणे महत्त्वाचे ठरते. ह्या संबंधात राजनैतिक हित महत्त्वाचे ठरते; स्त्रीचे वैयक्तिक हित विचारात घेण्याचा प्रश्नच उरत नाही. क्रेमलीनमध्ये अध्यक्ष सुकार्णो गेले त्यावेळी रशियन तरुणीने माझे चुंबन घेऊन माझे रशियात प्राथमिक स्वागत करावे अशी त्यांनी सूचना मांडली. सौ. क्रुश्चेव्हने मागील ओळीत बसलेल्या एका आकर्षक रशियन तरुणीस खूण केली. असले स्वागत करण्याविषयी तिने 'नाराजी' व्यक्त करताच सौ. क्रुश्चेव्हने रागाने तिच्यावर डोळे वटारले. न बोलता ती तरुणी उठली व सुकार्णोस पाहिजे त्याहून सरस असे चुंबन घेऊन त्यांचे तिने स्वागत केले !

राजाजी कर्मठ ब्राह्मण. गांधीजी पुरे वनिया. लोकमताची पर्वा न करता राजाजींनी देवदास गांधींना आपले जामात बनविले व सर्वात महत्त्वाचा कॉंग्रेसचा मोहरा हस्तगत करून घेतला. टिळकांनीदेखिल कोल्हापूर व नेपाळ येथील राजघराणी लग्नगाठीने जोडली जावीत असे प्रयत्न खाडीलकरांच्या मार्फत चालविले होते. ब्रिटिशांच्या ध्यानात आल्यामुळे अर्थातच ते निष्फळ ठरले. बडोदे व जयपूर यांना अशाच विवाहबंधनामुळे एकत्र आणण्यात आले आहे. धूर्त ब्रिटिशांनी आपल्या मार्फत अशी योजना केली होती की तरुण भारतीय विद्यार्थी आय. सी. एस. किंवा बॅरीस्टरीची परीक्षा दिल्यानंतर नेमके इंग्रज पोरींच्या मायाजाळ्यात सापडावेत. ह्या पोरी स्वयंपाकिणी, चांभार किंवा वेटर्स असत. ब्रिटिश रक्ताशी नाते जोडल्यावर राजनिष्ठा स्वाभाविकच पाळली जाई. एक नाणावलेले अर्थशास्त्रज्ञ तरुण मुलांना नेहमी सांगत की, 'ब्रिटिश मुलींशी लग्न कदापीही करू नका.' कारण हे कलेक्टर कचेरीत गेले की त्यांच्या 'कुक' बायकोचे बवर्जीशी प्रेमाचे चाळे सुरू होत ! 'Water seeks its own level असा विज्ञानाचा नियम प्रेमातही खरा आहे.

## नेपोलियनची कौटुंबिक दुर्दशा

राजनैतिक संबंध वाढविण्यासाठी केलेले शरीरसंबंध सुखी होत नाहीत असे आढळते. कारण दोघांनाही हे लग्न आपणांवर बळजबरीने लादले गेले आहे . याची रुखरुख जन्मभर राहते. राजकारणी पुरुष त्याचे सुख त्यास पाहिजे तेथून मिळवितो. Action and reaction are equal and opposite असे एक प्रमेय आहे. नेपोलियनचे जीवन ह्या क्रिया व प्रतिक्रिया यांच्या संघर्षामुळे बरबाद झाले. पुत्र प्राप्तीसाठी व राजकीय सख्यत्वासाठी नेपोलियनने आपल्या लाडक्या जोसेफाईन राणीला घटस्फोट देऊन ऑस्ट्रीयन राजकन्या मेरी लुईसशी लग्न लावले. लुईसाला लग्नानंतर वर्षभरातच पुत्रप्राप्ती झाली. पुत्रजन्माचा सोहळा पॅरीस येथे मोठ्या दिमाखाने साजरा झाला. दुर्दैवाने हा पुत्र कुलक्षयी निघाला. त्याच्या जन्मापासून बापाच्या सामर्थ्याला ओहोटी लागली. पुढे मायलेकरे ऑस्ट्रीयास गेली. ती पुन्हा म्हणून फ्रान्समध्ये दिसली नाहीत. लुईसा तरुण, उन्मादक, आळशी व बालिश होती. पतीच्या पडत्या काळात ती सरळ परपुरुषांशी रतली. काऊंट नेपर्ग व पुढे काऊंट बॉंवेलस् यांच्याशी तिने लग्ने लावली. या दोघांपासून तिला मुले झाली. शत्रू राष्ट्रांनी बहाल केलेल्या पर्माची जहागिरदारी भोगत असता ती १८४७ साली वारली. मनाने नेपोलियनशी ती एक दिवसदेखील समरस झाली नाही. नेपोलियनने आपल्या मृत्युपत्रान्वारे 'माझे काळीज मद्यार्कात घालून माझ्या पत्नीकडे रवाना करा' अशी सूचना केली होती ! पण काळीज नसलेल्या या बेईमान स्त्रीने आपल्या वीर पतीवर जेथे कधी प्रेमच केले नाही तेथे त्याच्या भावनांची ती कसली कदर करणार ? फार काय, आपला पहिला मुलगा नेपोलियनपासून झाला म्हणून त्याचीही तिने आबाळ केली !

वैवाहिक अस्थिरता हा बहुधा संसर्गजन्य रोग आहे. नेपोलियनचे सारे घराणे पुढे याच रोगास बळी पडले. नेपोलियनने आपल्या थोरल्या बहिणीस–एलीसास–चांगले स्थळ पाहून दिले. पतीस व बंधूस तिने मात्र अपेक्षित असलेली साथ व सुख कधीच दिले नाही. सत्ता नि अधिकार हाती आल्यामुळे ती जास्त स्वार्थी बनली, मोहवश झाली आणि त्यापायी तिला नेपोलियनची बरीच नाराजी ओढवून घ्यावी लागली. भावाच्या कृपेने ती टस्कन्स्कीची ग्रँड डचेस झाली होती. नवऱ्याशी तिचे कधीच पटले नाही. ती चतुर होती पण तितकीच घमेंडखोर, धनलोभी व स्वैराचारी होती. ती लुसियनशी लागू होती. ह्या प्रकरणाचा बभ्रा झाला तेव्हा नेपोलियन चिडून म्हणाला, "Disgraceful behaviour! While I am wearing myself out trying to make people moral and respectable once more, my brother and sister appear before the footlights almost naked"!

एलीसा, पॉलीना व कॅरोलीन या नेपोलियनच्या सख्ख्या बहिणी. यापैकी एकीनेही नेपोलियनला स्वास्थ्य लाभू दिले नाही. पॉलीन सर्वांत सुंदर, गोड व आनंदी. साऱ्या भावांची ती विशेष लाडकी होती. तिच्या स्वैर वर्तनाचे वर्णन एका ग्रंथकाराने "कपडे बदलावेत त्याप्रमाणे ती नित्य नव्या पुरुषाची सोबत करीत असे" ह्या शब्दात केले आहे. नेपोलियनचा एक सैनिक मित्र अधिकारी जुनोट तिच्यावर फिदा होता. त्यांच्या लग्नाला नेपोलियननेच विरोध केला. भावाच्या इच्छेनुसार तिचे लग्न जनरल लेकलर्कबरोबर झाले. तो अकाली निधन पावताच प्रिन्स् कॅमिले बोर्गीजशी तिचे दुसरे लग्न झाले. एक वदंता अशी होती की तिचे एका पेंटरशी प्रेमसंबंध होते.





अनुक्रमणिका



## क्रिकेट आणि दारुबंदी

**विख्यात कॉमेंटेटर पिअरसन सुरीटा इ. स. १९५१ मध्ये भारत आणि इंग्लंड यांच्यात होणाऱ्या कसोटी सामन्याचा धावता वृत्तान्त सांगत होते. हा सामना मुंबईच्या 'ब्रेबॉर्न' वर खेळला जात होता. भारताने आपला पहिला डाव ९ बाद ४८५ धावांवर सोडला. इंग्लंडने पहिल्या डावात ४५६ धावा केल्या. त्यात टॉम ग्रॅव्हेनीच्या होत्या १७५. वृत्तान्त सांगताना पिअर्सन ग्रॅव्हेनीच्या खेळाबद्दल म्हणाले** This afternoon from Graveney's bat has flowed the champagne of Cricket. **(शॅंपेन म्हणजे एक प्रकारचे चमकदार मद्य) ग्रॅव्हेनीचा खेळ शॅंपेनसारखा चमकदार झाला असे पिअर्सनना म्हणायचे होते. सायंकाळी सुरीटा आकाशवाणीच्या स्टुडीओत गेले तेव्हा तिथल्या अधिकाऱ्याच्या कपाळावर आठ्या पडलेल्या बघून त्यांना आश्चर्य वाटले. त्याचं कारण कळल्यावर त्यांना आश्चर्याचा आणखी एक धक्का बसला. त्यावेळी मुंबईत नुकतीच दारूबंदी झाली होती. तेव्हा वृत्तान्त ऐकणाऱ्या एका मंत्री महाशयांनी आकाशवाणीवरून 'शॅंपेन'चं नाव ऐकताच आपल्या खात्याच्या अधिकाऱ्यातफ स्टेशन डायरेक्टरकडे निषेध नोंदविला होता.**

नेपोलियनचे खाजगी जीवन येथे मोठ्या लोकांच्या घरात काय चालते याचा नमुना म्हणून सादर केला आहे. दिव्याखाली अंधार असतो त्याप्रमाणे फार मोठ्या घरांतून या अनैतिक संबंधांची चंगळ दिसून येते. या घरात आपापल्या स्वार्थासाठी येणारा जाणारा स्तुतीच करतो, खरे बोलण्यास कचरतो व पापांचीसुद्धा तरफदारीच करतो. सत्ता, अधिकार व गडगंज पैसा यांच्या जोरावर वृत्तपत्रांतून होणारा अपप्रचार व नैसर्गिक आपत्ती यांच्यावर बंदी घालता येऊ शकते. निरनिराळ्या संस्थानिकांची लफडी व भानगडी वर्णन करायची झाल्यास त्यासाठी एनसायक्लोपीडीया ब्रिटानिकाप्रमाणे ग्रंथावळी तयार करावी लागेल. सरदार वल्लभभाईंनी संस्थाने खालसा केली त्या दिवशी त्याना हजारो निष्पाप तरुणींकडून दुवे मिळाले असतील! एका संस्थानात एका पांढऱ्या घोड्यावर बसून तेथील महाराजांचा एजंट सकाळी शहरात आज कोणच्या नवीन तरुणीस महाराजांसाठी शोधून काढावे या कामगिरीसाठी फिरत असे. त्यावेळी साऱ्या सुन्दर स्त्रिया घरात लपून बसत! या पारध केलेल्या तरुणींच्या नवऱ्यांना ते संस्थानी नोकरीत असल्यास तावडतोब बढती मिळत असे! आजही मध्य प्रदेशातील व महाराष्ट्रातील काही मंत्र्यांची असल्या कर्तबगारीविषयी ख्याती आहे. पं. नेहरूंकडे काही मंत्र्यांच्या बायका, 'आमच्या नवऱ्यांना परदेशी धाडू नका, ते तेथे त्यांच्या स्टेनोसह जाऊन मजा मारतात', अशी मत्सरग्रस्त तक्रार करीत! बिचारे नेहरू अशा नाजुक बाबतीत काय करणार?

### डिवचलेल्या नागिणी

शरीरसुख ही एक आवश्यक भूक आहे. ती भागविणे अन्नाप्रमाणेच जरूरीचे कर्तव्य आहे. बऱ्याच राजकारणी पुरुषांची ही नैसर्गिक भूक अवास्तव राक्षसी असते. त्याचा ताप अर्थातच निष्पाप, कोवळ्या व सुंदर तरुणींना होतो. हीच भूक स्त्री-राजकर्त्यांच्या मनात वळावली की या स्त्रिया स्त्रिया रहात नाहीत, त्या डिवचलेल्या नागिणी होतात. त्यांना जो नाराज करील त्याचे कंदन होते. कामरूपी अग्नि पुरुषाच्या ठिकाणी पेटला तरी आग मर्यादित राहते. स्त्रियांच्या बाबतीत एवढ्याचे एवढे होते. राजदरबारात मत्सर व हेवेदावे सुरू होतात. त्याबरोबर गटबाजी व कटबाजी चालू होऊन सरतेशेवटी त्या स्त्रीचा त्यात नाश होतो. विशेषत: स्त्रीस मार्गदर्शन करण्यासाठी कोणी समर्थ पुरुष लागतो. या दोघांविरुद्ध इतर सारे गोळा होतात व त्यात दोघांचाही काटा काढला जातो. रझिया या हुषार व कर्तबगार राणीचा शेवट असाच शोकदायक झाला. रशियाच्या झारीणींच्या दुर्वर्तनाविषयी असेच लिहिले गेले आहे. कोल्हापूरहून असल्या विचित्र मागणीस भिऊन पळून आलेले एक उमदे व देखणे चित्पावन गृहस्थ आज पुण्यात स्थायिक झालेले मला माहीत आहेत.

भारतीय इतिहासाच्या दृष्टीने पुराणे व बखरी म्हणजे भारुडे वाटतात. राजपुतांचे रासो म्हणजे फाजील स्तुती वाटते. त्यामानाने राजतरंगिणी हा संस्कृत भाषेतील शेवटचा इतिहास ग्रंथ नि:स्पृह, विवेचक व यथातथ्य इतिहासाचे दर्शन घडविणारा वाटतो. कल्हणाने काश्मीरच्या कामांध राजेराण्यांचे बहारदार वर्णन केले आहे. काश्मीरच्या गादीवर अल्पवयी गोपाळवर्मा बसला. त्याची आई राणी सुगंधा त्याची पालक म्हणून कारभार पाहू लागली. ती कोषाध्यक्ष प्रभाकरदेवाशी लागू होती. बालराजाला हे कळताच त्याने चौकशी आरंभिली. पण प्रभाकरदेवाने बालराजाचा खून करविला. त्याच्या भावास गादीवर बसविण्यात आले. पुढे तो मेल्यामुळे राणी सुगंधा हिने स्वत: मुकुट धारण केला. तिने निर्जितवर्मा या राजपुत्रास गादीवर बसविण्याची खटपट चालविली. मंत्रिमंडळाने त्याच्या पार्थ नामक अल्पवयीन राजपुत्रास गादीवर बसविले. अशाने पितापुत्रातच लढाई जुंपली! निर्जितवर्म्याच्या राण्या दुर्वर्तनी होत्या. एक श्रेष्ठ मंत्री या राण्यांशी लागू होता. प्रेमचाळ्यांनी तो या बप्पटदेवीला खूष करी व तीही त्यास अगणित द्रव्य पुरवी. दुसरी राणी या मंत्र्याची रखेली बनली होती. तो या दोघी राण्यांची कामना आळीपाळीने पुरवीत असे. आपापल्या पुत्रांना राज्य मिळवून देण्याच्या स्पर्धेने सुगंधादित्य नावाच्या या श्रेष्ठ मंत्र्याला शरीरसुख व पैसा देण्यात या दोघी राण्यांची जणू चढाओढ लागली होती. कल्हण लिहितो, 'नदीतील तिमी मासा इतर तिमींना खातो, त्या तिमीला







अनुक्रमणिका

ध्यानी बगळा गट्ट करतो आणि त्या बगळ्याची शिकार व्याघ्र करतो, असा हा प्रकार होता'

पुढे क्षेमगुप्त हा गादीवर आला. लवाड विट चावटपणा करून त्याची कृपा संपादीत असत. हे निर्लज्ज विट आपल्या स्त्रियांचा त्या राजाच्या कामवासनेला बळी देऊन कोणाची स्त्री अधिक पसंत पडते असे निर्लज्जपणे विचारीत. हा राजा देवीने गेला. इ. स. ९५८ मध्ये त्याच्या अल्पवयी मुलास गादीवर बसविले तरी खरी सत्ता राणी दिद्दा हिच्या हाती गेली. ही दिद्दा राणी भ्रष्टाचाराची चालती बोलती मूर्तीच होती. व्यभिचार व अन्य मार्गांनी आपल्या अधिकाराच्या वाटेतील अनेक मंत्र्यांचे काटे तिने दूर केले. तिने दोन नातवांचा खून करून तिसऱ्या नातवास गादी दिली. एका तुंग नावाच्या गुराख्यास वाड्यात सहज पाहिल्याबरोबर तिचे त्यावर मन बसले. त्याला तिने आपला वल्लभ बनविले. हा पुढे मंत्री झाला! कल्हण लिहितो, 'मोठ्या कुलात उत्पन्न झालेल्या स्त्रियांची महानद्यांसारखी उपजतच नीचगामी प्रवृत्ती असावी याला काय म्हणावे हेच कळत नाही! सान्या जलाचा राजा जो सागर त्याच्यापासून निघालेली लक्ष्मी क्षुद्र पल्लवात पैदा झालेल्या कमलाशी संसक्त होते, तद्वत् उच्चकुलीन स्त्रिया नीचांशी रममाण होत असतात.'

## थोर राजकारणी स्त्रिया

कल्हणाशी या बाबतीत आपण पूर्णपणे सहमत आहोत. माझ्या मते राजमहालात सतत कोंडलेल्या व पुष्ट अन्न खाऊन शरीर मस्त असलेल्या या स्त्रियांचे " baser instincts इतरांपेक्षा जास्त "जागृत' राहतात. चांगल्या, हुशार व सुसंस्कृत पुरुषांना शिक्षणामुळे आपल्या वर्तणुकीवर नैतिक बंधन ठेवावेसे वाटते. हलके पुरुष कोणतेही बंधन न पाळल्यामुळे रतिशास्त्रात पारंगत होतात व असल्या नीच स्त्रियांना जास्त सुख देऊ शकतात. एकदा या नीच लोकांच्या तावडीत या स्त्रिया फसल्या की त्यांना सहजासहजी बाहेर पडता येत नाही. पतनाची क्रिया चेन रीॲक्शनप्रमाणे अखंड चालूच रहाते. कल्हण लिहितो, 'अश्लील नर्मवाक्ये म्हणजेच विनोद, प्रजापीडन हेच न्याय्यकर्म, निर्लज्जपणा हीच तेजस्विता, अगम्यांगनागमन हीच खरी रसिकता व लुच्च्या लफंग्यांनी दिलेल्या शिव्या निमूटपणे सोसणे म्हणजेच सरळपणा असे मानणाऱ्याला कोणती गोष्ट वाईट व त्याज्य असणार?'

हे वर्णन वाचून कोणीही विचारील, 'हे तर एकतर्फी वर्णन वाटते. एलीझाबेथ व कॅथराईन या राण्यांच्या कारकीर्दीत इंग्रजी वाङमय फुलले नाही काय? राणी लक्ष्मीबाई व राणी अहिल्याबाई या स्त्री राजकर्त्याच होत्या ना? कौसंबीच्या राजमातेने तर पुरुषांच्या तोंडात मारील इतके व्यवस्थित शासन चालविले ना? पृथ्वीराजाबरोबर ११९३ साली मेवाडचा राणा धारातीर्थी पडला. ह्याच्या कुमारदेवी नावाच्या राणीने सैन्याची प्रमुख बनून कुतुबुद्दीन सुलतानास धूळ चारली ना? राणा संगाची विधवा करुणावती हिने मुसलमानांपासून चितोडच्या किल्ल्याचे संरक्षण केले ना? महाराष्ट्रात जिजामाता व राणी ताराबाई यांचे कर्तृत्व काय कमी होते का? वरील उदाहरणांवरून स्त्री राजकर्त्या नालायक कशा ठरतात?'

ह्या प्रश्नांची उत्तरे देणे फार अवघड काम आहे. स्त्रिया दुर्बलनी आहेत असे म्हणणे धाष्टर्याचे होईल. कारण स्त्रियांना बिघडविणारे शेवटी पुरुषच असतात ना? स्त्री ही शक्ती आहे त्याचप्रमाणे संपत्तीही. एखाद्यास ही संपत्ती फुकटात मिळाली की तो त्याचा दुरुपयोग करणारच. सत्ता, सुख, अधिकार व यौवन ह्या फुकट फौजदाराच्या मस्तकात चढल्यास नवल नाही. ह्या फुकट्याचे वैभव व चैनबाजी पाहून इतरांच्या हृदयात कसेसे होऊ लागले तर त्यात नवल कोणते? विशेषतः तरुण स्त्री-राजकर्ती अडचणींच्या डोंगरांना तोंड देत असता कोणा पुरुषाचा आधार शोधणारच नाही याची ग्वाही देता येणार नाही. पुरुष तर अशा संधीची वाट पहात 'क्यू'त उभेच असतात! सौ. जॅकलीन केनेडीचे पुनर्लग्न गाजले ते या कारणासाठी. भिकारणीने उद्या असा पाट लावला तर त्याकडे लक्षही जाणार नाही जगाचे!

आजकालच्या जगात जुनी मूल्ये झपाट्याने बदलत आहेत. जडवादाची महती लहान मुलापासून वृद्धापर्यंत सर्वांना पटून चुकली आहे. स्त्री-राजकर्ती आपल्या पंजात अडकली तर सत्ता, अधिकार, सुख व यौवन यांची प्राप्ती एका क्षणात होईल हे गणित राजकारणी पुरुषांना कळत का नाही? जीवनमूल्ये आज इतकी बदलली आहेत की एक सर्वोच्च सी. आय. डी. अधिकारी मला म्हणाले, 'पूर्वी

लो. टिळकांच्या नजरेस नजर भिडताच ब्रिटीशांनी ट्रेन केलेल्या बाईनी सांगून टाकले कोर्टात की बाप ज्याप्रमाणे आपल्या मुलीकडे बघतो त्याप्रमाणे लोकमान्य माझ्याकडे बघत !' आजची एखादी बया हे सत्य सांगेलच का पैशांच्या लोभाने ते विपरीत करून ती कोर्टात काय सांगेल त्याचा भरवसा मी नाही देऊ शकत !'

**बातम्या न छापण्यासाठी पैसा**

आज रोजच्या जीवनातील मूल्ये एवढी बदललेली आढळतात की जुन्या व्याख्याच बदलण्याची वेळ आलेली आहे. उदाहरणार्थ, वृत्तपत्रे बातम्या छापण्यापेक्षा कोणाची तरी बदनामी करण्याच्या कामातच जास्त गर्क दिसतात. बातम्या छापण्यापेक्षा त्या न छापण्यासाठीच आम्हांला जास्त पैसा मिळतो असे प्र. के. अत्रे यांनी मला एका भेटीत सांगितले होते. रोजच बदनामीचे प्रसंग वृत्तपत्रे आणतात. त्यामुळे पुढारीही आता जास्त घट्ट चामडीचे झाले आहेत. पूर्वी दुसरे लग्न केल्यामुळे ना. गोपाळ कृष्ण गोखले सामाजिक व राजकीय धकाधकीत प्रामुख्याने भाग घेण्यास पुढे येत नसत. त्यांचे मन कचरे. आज ते हयात असते तर त्यांनी कदाचित् तसा बुजरेपणा दाखविला नसता. राजकारणी पुरुषाने आजकाल धुतल्या तांदळाप्रमाणे स्वच्छ असले पाहिजेच असा आग्रह आजची जनता ठेवते असे वाटत नाही. भानगडी असल्या तर त्या मर्यादित असाव्या एवढ्या मतापर्यंत आजची पिढी आली आहे. म्हणून तरुण तरुण पोरींच्या सहवासात राहणाऱ्या व तपकिरीची डब्बीदेखिल सोन्याचीच हवी असा आग्रह धरणाऱ्या चिन्मयानंदांना आजची जनता विवेकानंद समजते ! After all he delivers the goods alright, isn't it ? हा प्रश्न मला अनेक जणांनी विचारला. राजकीय पुढाऱ्यांच्या बाबतीत आज तोच प्रश्न विचारला जाण्याची शक्यता जास्त आहे. पूर्वी त्यांच्या निवडीत कोण जास्त चांगला आहे हे पाहिले जाई. आजच्या लोकशाहीत सारेच एकापेक्षा एक इरसाल. आजचा प्रश्न असतो, Who is the lesser evil ?

राजकारणाच्या या बदलत्या मूल्यांच्या दृष्टीकोनातून स्त्री ही भावी राजकारणास उपकारक का अपकारक हे अजून ठरायचे आहे. हल्ली पूर्वीसारखी युद्धे रोज होण्याची शक्यता कमी. मात्र War of wits चा हा जमाना जरूर आहे. त्यात स्त्रियांचा जास्तीत जास्त उपयोग कसा होईल इकडे राजकारण खेळणाऱ्या रथीमहारथींचे लक्ष असते. धनलोभ, दागिन्यांचा लोभ, बडबडीची हौस, शरीरसुखाची भूक व पतीच्या किंवा मुलाबाळांच्या जीवास अपाय होईल ही भीती या गुणावगुणांचा हे लोक योजनाबद्ध फायदा कसा उठविता येईल याचा सतत विचार करीत असतात.

राजधानीत मी हिंडत असताना एका वरिष्ठ मंत्र्याने मला सुनावले, 'तुमचा राष्ट्रवाद मला पसंत आहे; पण कृपया दिल्लीच्या x x x भागात रात्रीच्या दहानंतर जात जाऊ नका. तुम्हाला चर्चेत गुंतवण्यात येईल, आता उशीर झाला, उद्या सकाळीच घरी

( पृष्ठ ३८ वर पहा )


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





....भारतीय क्रिकेट संघाची निवड करताना कोणकोणत्या कसोट्या लावण्यात येतात नि त्यात कोणते खेळाडू उत्तीर्ण होऊ शकतात?....

# भारतीय क्रिकेटची दुर्दशा

भारताचे कसोटी सामने ही अलिकडे एक डोकेदुखीच होऊन बसली आहे. कसोटी सामना म्हणजे कमालीची बेजबाबदारी असे जणू समीकरणच होऊन बसले आहे. क्रिकेटशी संबंध असलेल्या सर्वांनी आता जागृत होऊन विचार करण्याची वेळ आली आहे, मग ती व्यक्ती क्लब-हाऊसमधील एखादी मिनी-स्कर्टवाली पोरगी असो, खासगी क्लबचा उर्मट सेक्रेटरी असो, खेळाडूंची कशीतरी निवड करणारा निवड-समितीचा सभासद असो अगर चांगलेसे शिफारसपत्र मिळविण्याच्या आशेने परक्या खेळाडूची टोपी उचलून देणारा लाचार पंच असो!

क्रिकेट क्षेत्रात जागृती झाली नाही तर १९६७ च्या पहिल्या दिवशी कलकत्याच्या ईडन गार्डन्स मैदानावर घडलेला लाजिरवाणा प्रकार आणि परवा ८ नोव्हेंबरला मुंबईच्या ब्रॅबॉर्न स्टेडियमवर झालेले अपप्रकार यांची पुनरावृत्ती झाल्याशिवाय राहणार नाही.

मुंबईत घडलेल्या प्रकारांचे मूळ ब्रॅबॉर्न स्टेडीयमवरील प्रेक्षकांवर लादल्या जाणाऱ्या गैरव्यवस्थेत आहे हे शोधून काढण्यासाठी एखाद्या मानसिक-शास्त्रज्ञाची आवश्यकता नाही. सामना सुरू होण्यापूर्वी तास-दोन तास आधी ईस्ट स्टॅण्डवरील काँक्रीटच्या पायऱ्यांवर जागा पकडून बसणे आणि दिवसभर कडकडीत उन्हाचा मारा सहन करीत राहाणे ही काही सामान्य गोष्ट नाही. एकदा जागा पकडली म्हणजे दिवसभरात देहविधींसाठीही बाहेर जाता येत नाही आणि स्टॅण्डच्या भागात तसली काही सोयही नाही. ही झाली ईस्ट-स्टॅण्डची परिस्थिती. क्लब-हाऊसमधील परिस्थिती यापेक्षा काही वेगळी आहे असे मानण्याचे कारण नाही. तिकीटासाठी तीनशे रुपय खर्च करणाऱ्या प्रेक्षकाला तेथे ईस्ट स्टॅण्डवरील काँक्रीटच्या पायरीऐवजी बसण्यासाठी खुर्ची मिळते इतकाच काय तो फरक. बाकी परिस्थिती तीच. बॉम्बे क्रिकेट असोसिएशनच्या जागेत आणि नॉर्थ स्टॅण्डवर, तसेच अन्य ठिकाणीही हजारो प्रेक्षक चोरट्या मार्गांनी प्रवेश मिळवतात हे काही आता गुपित राहिलेले नाही. अशा प्रकारे होणारी अतोनात गर्दी आणि आवश्यक त्या सोयी पुरविण्याकडे अधिकाऱ्यांचे सतत दुर्लक्ष यामुळे निर्माण होणारा असंतोष कायमचा दबलेल्या स्थितीत राहणे शक्य नाही. त्या स्फोटक वातावरणाचा भडका उडविण्यासाठी लहानशी ठिणगीही पुरते. दिनांक ८ नोव्हेंबरला पंचाने दिलेल्या निर्णयाची ठिणगी उडाली आणि मग ते प्रकार घडले.

अरविंद लपके

त्या प्रकारांची जबाबदारी क्रिकेट क्लबच्या अधिकाऱ्यांनी आकाशवाणीच्या समालोचकावर टाकली; पण स्टेडियमवरील ट्रॅन्झिस्टर्सना बंदी करण्यासाठी हे अधिकारी प्रभावी उपाय मात्र योजीत नाहीत. तासाभरातून एखादा अधिकारी पाठवून किंवा कुठल्या तरी कोपऱ्यात छोटीशी पाटी लावून ट्रॅन्झिस्टर्सचा उपद्रव बंद होऊ शकणार नाही. त्यासाठी काहीतरी कडक उपाययोजना करणेच आवश्यक आहे. ट्रॅन्झिस्टर जप्त करणे आणि दिवसभराचा कारावास व शंभर रुपये दंड ठोठावण्याचा अधिकार असलेले शंभरावर सी. आय. डी. अधिकारी ठेवले तरच परिस्थितीत सुधारणा होण्याची शक्यता आहे; तथापि क्लबला जोपर्यंत जनतेचा पैसा—मग तो काळा असो की गोरा असो—भरपूर मिळत असताना क्लबचे अधिकारी असल्या गोष्टींकडे लक्ष देण्याची सुतराम् शक्यता नाही. जनतेची सेवा या अधिकाऱ्यांना माहीतच नाही. क्लबच्या सेक्रटरीला—मानद अगर वैतनिक—जनतासंपर्क अगर नम्रता यांची काहीच माहिती नसावी असे दिसते. एखाद्या गोष्टीचा बभ्रा होऊ द्यायचा नसेल अशाच वेळी फक्त वार्ताहरांवर स्मितपूर्वक वागणूक आणि पेये यांची खैरात करण्यात येते. एरव्ही त्यांना कोण विचारतो? त्यांनी काही सोयी-सवलतींची मागणी केली त॰ ती टबलाच्या खणात दडपून टाकण्यात

येते. खुद्द खेळाडूंचीही तीच परिस्थिती ! तो जर कसोटी सामन्यात खेळणारा खेळाडू असेल तरच त्याला साधारण आदराची वागणूक मिळते. जर का तो 'माजी' खेळाडू असेल तर विनराखीव जागेचा पास देऊन त्याची बोळवण करण्यात येते, जणु काही तो भीक मागण्यासाठीच आला होता.

मुंबईचा रणजी-ट्रॉफी खेळाडू आणि क्रिकेट क्लबसाठी खेळणाऱ्या मिलिंद रेगेला सुद्धा क्लबच्या एका बड्या अधिकाऱ्याने ओळख पटवून देण्यास फर्मावले. खुद्द या अधिकाऱ्याची ओळख दाखविणारा बिल्ला वगैरे नव्हताच, पण त्याची अरेरावीची वागणूक आणि उर्मटपणा यावरून तो अधिकारी असावा असे वाटत होते. असल्या वागणुकीमुळेच कडवटपणा वाढत जातो आणि मग त्याचा केव्हाही स्फोट होण्याची शक्यता असते. क्लबच्या सर्वच अधिकाऱ्यांना—मग ते गणवेश वापरणारे असोत अगर साधे कपडे घालणारे असोत—जनतासंपर्काचे प्रशिक्षण देण्याची खास आवश्यकता आहे, असे मला वाटते. क्लब हाऊसमध्ये जागा अडविणाऱ्या मिनी-स्कर्टवाल्या पोरी, टाईट पँटी घालणारे छोकरे आणि स्वत:ला क्रिकेटप्रेमी समजणारे धनिक यांना क्रिकेटच्या खेळाच्या माहितीचे प्रशिक्षण दिले पाहिजे. नाहीतर नरेंद्र तम्हाणे, उमेश कुळकर्णी, साधू पाटील यांच्या सारख्यांना प्रश्न विचारून भंडावून सोडणार नाही अशा अटीवरच त्यांना क्लब हाऊसमध्ये प्रवेश देण्यात यावा. आपल्या खेळाडूंची स्तुती करण्याने त्यांचा काहीच फायदा नाही हे या मिनी-स्कर्ट पोरींना कळेल तर बरे होईल ! आमचे कुंडबुडे क्रिकेटप्रेमी काही म्हणोत, पण आमच्या कसोटी-वीरांना अग्य आकर्षणांपासून आणि वारेमाप स्तुतीपासून दूर ठेवले पाहिजे. काही थोडे वेस्ट इंडीयन खेळाडू वगळले तर बाकीचे सर्व परदेशी खेळाडू कणखर असतात. आपल्याकडील अति-आतिथ्यवादी आणि गैरसमजुतीने भारलेल्या यजमानांनी अगर यजमानसंस्थांनी आपले खेळाडूही शिस्त पाळतील तर बरे हे ध्यानी ठेवले पाहिजे.

क्रिकेट बोर्डाने आणखी एका गोष्टीची दखल घेतली पाहिजे आणि ती म्हणजे भारतीय पंचांचे नाव उज्ज्वल राखण्याची! आपल्या पंचांची कुचेष्टा करणारा एखादा टॉम-डिक-हॅरी (सिम्प्सन) चा लेख प्रसिद्ध झाल्यावर रागारागाने त्याला उत्तर देणारे पत्रक काढण्याने काम भागणार नाही. पंचांच्या निर्णयामुळे स्टॅण्डमध्ये झालेल्या जाळपोळीबद्दल परदेशी कर्णधाराकडे क्षमायाचना करण्यानेही काही साधणार नाही. सर्वात आवश्यक गोष्ट म्हणजे पंचांची निवड अत्यंत कसोशीने झाली पाहिजे. त्यात वशिलेबाजीला वाव असू नये. बोर्डाने दोघा-तिघा उत्कृष्ट पंचांची नि:पक्षपातीपणाने निवड करून त्यांची पाचही सामन्यांसाठी नियुक्ती केली पाहिजे. बोर्डाने असे कधी केले आहे का ? या प्रश्नाचे उत्तर अर्थातच नकारात्मक आहे. वाटल्यास कोणाही वाचकाने रणजी ट्रॉफी सामन्यांमधील कोणाही ज्येष्ठ खेळाडूकडे मुंबईतील ऑस्ट्रेलिया-बरोबरच्या कसोटी सामन्यातील दोघाही पंचांच्या कार्यक्षमतेबाबत चौकशी करावी. त्याला मिळणारे उत्तर त्याला खरोखरच आश्चर्यचकित करून सोडील. वरील दोघाही पंचांची नावे पंचांच्या यादीत बऱ्याच वरच्या क्रमांकावर आहेत हे खरे ! त्यांचा ज्येष्ठताक्रमही (सीनियॉरिटी) बराच वर आहे; पण डोक्यावरील पांढऱ्या केसांच्या संख्येवर पंचाची गुणवत्ता ठरवावयाची नसते. क्रिकेटविषयक नियमांची त्याला संपूर्ण माहिती पाहिजेच, पण शिवाय एकाग्रता, तीक्ष्ण दृष्टी यांचीही आवश्यकता असते. मुंबईतल्या परवाच्या कसोटी सामन्यातील एका पंचाने १९६६ मध्ये कलकत्त्याला वैद्यकीय तपासणीला स्पष्ट नकार दिला होता, हे नमूद करण्यासारखे आहे. अशा परिस्थितीत बोर्डाने त्याची पंच म्हणून निवडच का करावी ? बोर्डावर त्याचा कोणी मित्र आहे हे त्याचे कारण असेल काय ?

रूबेनसारख्या पंचाला संधी मिळत नाही याला काय म्हणावे? त्याने आतापर्यंत प्रथमश्रेणीच्या ३५ सामन्यांमध्ये पंचाचे काम केलेले आहे. गोठसकरलाही का संधी मिळू नये ? रूबेन म्हणे चष्मा लावतो. हा शुद्ध मूर्खपणा आहे. एखादा पंकज रॉय चष्मा लावून खेळू शकतो, मग रूबेननेच काय पाप केले आहे ? गोठसकरने म्हणे फक्त सहाच रणजी ट्रॉफी सामन्यांमध्ये पंच म्हणून काम केलेले असल्याने तो अजून अ-परिपक्व (ज्युनियर) मानला जातो. हाही खुळचटपणाच आहे. कारण नागेंद्र राव याला तर फक्त एकाच प्रथमश्रेणीच्या सामन्यात काम केल्यावरोबर कसोटी सामन्यात पंचाचे काम मिळाले होते. कारण

## टेस्ट क्रिकेटमध्ये भारताची कामगिरी

**दोन हजार धांवापेक्षा जास्त धावा करणारे फलंदाज :**

| खेळाडू | सामने | धांवा | उच्चांक | शतके | सरासरी |
|---|---|---|---|---|---|
| उम्रीगर | ५९ | ३६३१ | २२३ | १२ | ४२.२२ |
| मांजरेकर | ५५ | ३२०९ | १८९ नाबाद | ७ | ३९.१३ |
| बोर्डे | ५४ | ३०४२ | १७७ नाबाद | ५ | ३६.२१ |
| पंकज रॉय | ४३ | २४४१ | १७३ | ५ | ३२.५४ |
| पतौडी | ३१ | २२०३ | २०३ नाबाद | ६ | ४०.७९ |
| विजय हजारे | ३० | २१९२ | १६४ नाबाद | ७ | ४७.६५ |
| विनू मंकड | ४४ | २१०९ | २३१ | ५ | ३१.४७ |
| जयसिंहा | ३५ | २०१७ | १२९ | ३ | ३३.६१ |



अनुक्रमणिका





**उघडच** आहे आणि ते म्हणजे नागेंद्र राव याचा बोर्डावर एक मित्र आहे. विच्चारे **रूबेन नि गोठसकर!** त्यांना त्यांच्या विभागांचाही जोरदार पाठिंबा नाही की त्यांच्या अंगी स्तुतिपाठकपणा नाही.

पंचांच्या स्तुतिपाठकपणामुळेच बोर्डात त्यांची किंमत साफ घसरली आहे. नाहीतर कसोटी सामन्याचे साडेसत्तावीस तास उन्हातान्हात उभे राहून काढण्याची कठीण कामगिरी अवघ्या तीनशे रुपये मोबदल्यात त्यांना करावी लागली नसती. खेळाडूंना आणि बोर्डाच्या अधिकाऱ्यांना विमान प्रवासाचे भाडे देण्यात येते, पण पंचाला मात्र रेल्वेनेच प्रवास करावा लागतो. कसोटी सामन्यातल्या राखीव खेळाडूलाही रु. ७५० मिळतात. मग त्याच्यापेक्षा कमी म्हणजे फक्त चारशे रुपये (भत्त्याचे शंभर रुपये धरून) मिळविणाऱ्या पंचाबद्दल त्याला कितीसा आदर वाटेल ?

पंचांच्या या परिस्थितील स्वतः पंचही फार मोठ्या प्रमाणात जबाबदार आहेत. आपला दर्जा आणि प्रतिष्ठा वाढविण्यासाठी त्यांनी काहीच केले नाही. गौरवर्णीय कर्णधाराकडून शिफारसपत्र मिळविण्यासाठी आपल्या स्वाभिमानाचाही खातमा करून लॉरीने रागाने आणि खिलाडूपणाला शोभणार नाही अशा आविर्भावाने जमिनीवर आपटलेली टोपी उचलून देण्याची लाचारी पंचाने पत्करावी ही नामुष्कीची गोष्ट आहे. गोऱ्या हॅडलीची टोपी झेलून घेण्यासाठी पंच धावतील पण हर्डीकरने टोपीची घडी करून दिली नाही म्हणून ते नाराजी प्रगट करतील. एका पठ्ठ्याने तर पुढल्या कसोटी सामन्यांमधील आपली नियुक्ती कायम करण्यासाठी कानपूर कसोटी सामन्याच्या कितीतरी आधी कानपूरला जाऊन बाऊंड्ऱ्यांच्या खुणा, पीच झाकून ठेवणे आणि पोलिस बंदोबस्ताची व्यवस्था करणे ही कामे अंगावर घेतली. वास्तविक नियमाप्रमाणे (नियम ३ ची पहिली टीप) पंचाने प्रत्येक दिवशी खेळ सुरू होण्याच्या वेळेपूर्वी अर्धा तास मैदान-अधिकाऱ्याकडे हजर व्हावयाचे असते. लक्षात ठेवा, फक्त अर्धा तास आधी! कानपूरला धावलेल्या ढगळ कपडे वापरणाऱ्या आणि बोर्डाच्या इशाऱ्यासरशी वाटेल ती कामे करणाऱ्या पंचाप्रमाणे नव्हे ! पंच मंडळींनो, जागे व्हा! क्रिकेट बोर्ड सदस्यांनो जागे व्हा! आपसातील राजकारण विसरा आणि आपल्या देशाच्या इभ्रतीचा विचार करा!

देशाची इभ्रत! भारताचा क्रिकेट संघ निवडण्याच्या प्रत्येक वेळीं हा शब्दप्रयोग स्वप्नवत ठरला आहे. निवड करणारे खेळातील अडचणींवर मात करणाऱ्या खेळाडूंचा समावेश हमखास होईल असे निश्चित धोरण आखीतच नाहीत. नावाभोवती कसले तरी वलय असणाऱ्या खेळाडूंची निवड करून ते मोकळे होतात. या धोरणाचा नुक्ताच फटका बसला तो चेतन चौहानला! न्यूझीलण्डबरोबरच्या दोन कसोटी सामन्यांमध्ये त्याचा समावेश झाला होता पण आता ऑस्ट्रेलियाबरोबर पश्चिमविभाग संघातून खेळण्यासही तो अपात्र ठरला. न्यूझीलण्डबरोबरच्या तिसऱ्या कसोटी सामन्यांतून वगळण्यांत आलेल्यां अशोक मन्कडला ऑस्ट्रेलियाच्या मॅकेन्झीच्या गोलंदाजीला तोंड देण्यासाठी सलामीचा खेळाडू म्हणून पात्र ठरविण्यात आले.

निवड समितीवरील ज्या सदस्यांना महत्त्वाचे सामने पाहण्यास वेळ नाही अशा सदस्यांनी आपल्या जागा इतरांसाठी खाली करून देणेच इष्ट. विश्वनाथचा खेळ पाहिला नाही म्हणून भारतीय संघात त्याचा समावेश करू नये असे म्हणणाऱ्या निवड समितीच्या सदस्यांनी खरोखरच निवृत्त झाले पाहिजे. भारत हा एकच एक असा देश आहे की जिथे क्रिकेट खेळाडूंची निवड नेटप्रॅक्टिसच्या अर्ध्या तासाच्या खेळावरून होते अगर निवडसमितीचा सदस्य आपल्याजवळ बसलेल्या छान छोकरीला सिली-मिडऑन किंवा थर्ड मॅन म्हणजे काय हे समजावून सांगण्यात गुंतल्यामुळे उमेदवार खेळाडूने मिळविलेल्या धावांकडे त्याचे दुर्लक्ष होऊन या बिचाऱ्या खेळाडूचे भवितव्य धोक्यात येऊ शकते.

यातला विनोदाचा भाग बाजूला ठेवला तरी आपल्या देशाची भौगोलिक रचना ध्यानी घेऊन खेळाडूंच्या निवडीसाठी सतत दौरे करणारी निवड समिती नेमली पाहिजे. समितीच्या सदस्यांना चांगले वेतन दिले पाहिजे आणि किमान तीन हंगामांची तरी कामगिरी त्यांच्यावर सोपविली पाहिजे. तरच निवड समितीकडून घडणाऱ्या अनिष्ट गोष्टी टळतील आणि देशाच्या इभ्रतीचा विचार बाजूला सारून आपल्या मित्राची वर्णी लावण्याच्या प्रथेला पायबंद बसेल.

पण आपले दुर्दैव असे की फक्त देशभक्तांनाच देशाच्या इभ्रतीची कदर वाटते. बेजबाबदार लोकांना ती दुय्यम दर्जाची वाटते. त्यामुळे भारताचा क्रिकेटमधला दर्जा दुसऱ्या क्रमांकाचा न ठरता तिसऱ्या दर्जात तो ढकलला जात आहे—क्रिकेटचा खेळ, पंचांची कामगिरी आणि अधिकाऱ्यांचे कर्तव्य या सर्वच बाबतीत आपण तिसऱ्या दर्जाचे ठरत आहोत.

( **'टाईम्स ऑफ इंडिया 'वरून** )

---

[पान ३४ वरून—**स्त्री आणि...**]

जा वगैरे सांगण्यात येईल व रात्री तुमच्या नकळत इन्फ्रा रेड किरणांनी सबंध फील्मच्या फील्म घेतली जाईल काही वेडीवाकडी योजना करून. ती फील्म जोपर्यंत त्यांच्या ताब्यात आहे तोपर्यंत तुम्ही त्यांच्या पंजात राहणार जन्मभर! कसला राष्ट्रवाद अन् कसला प्यारा देश ?" स्त्री ही रोजच्या व्यवहारात इतकी घातक असू शकते ते पाहून माझ्या छातीत धडकीच भरली !

२६ ऑगस्ट रोजी बलराज मधोक यांनी लोकसभेत प्रश्न विचारला की दिल्लीतील हॉटेलांतून 'कॉल गर्ल रॅकेट्'चा सुळसुळाट वाढला आहे, सरकार हा वाढता गुन्हा कमी करण्याच्या दृष्टीने कोणते उपाय योजीत आहे ? असे म्हणतात की दिल्लीतील काही श्रेष्ठीच या प्रकरणात जबाबदार आहेत. पाणी नेहमी उंचावरून खाली येते. त्यांनी सध्या भारतात हिप्पींचा त्रास वाढला असून तेही या गडबडीत हात धुवून घेत आहेत असा आरोप केला. डी. एम. के. सदस्य व्ही. कृष्णमूर्ती यांनी बलराज मधोक कॉल गर्ल्स्चे "बळी" झाले की काय असा प्रश्न विचारून लोकसभेत खसखस पिकविली. सरकारने मधोकांना काय उत्तर द्यावे ? म्हणे, 'आम्हांस माहीत नाही'. कायदे मंत्री गोविंद मेनन यांनी अशा चाळीस केसेस झाल्या ही माहिती दिली व १३५ माणसांची गेल्या वर्षी धरपकड झाल्याचे सांगितले. याचा अर्थ, राजकारणातील कटबाजी साधण्यासाठी राजधानीत स्त्रियांचा वापर जास्त प्रमाणावर होत आहे, हे वृत्त वाचून स्वर्गस्थ आर्य चाणक्यास निश्चित आनंद होईल. कुप्रसिद्ध विषकन्यांचा चाणक्य जनक समजला जातो. ● ● ●

# मला आवडलेले क्रिकेट समीक्षक

—अरविंद ताटके

.... क्रिकेटचा खेळ पहाण्यात जी मौज आहे तसाच आनंद क्रिकेट विषयक वाङ्मय वाचण्यातही आहे. ब्रॅडमनपासून ते आमच्याकडील बाळ पंडितापर्यंतच्या क्रिकेट समीक्षकांच्या कामगिरीचे हे धावते वर्णन.

लहानपणापासून क्रिकेटविषयक वाङमय वाचण्याचा मला नाद आहे. परंतु शाळेत असताना क्रिकेटविषयक मनोरंजक माहितीची भूक फक्त इंग्रजी वृत्तपत्रांवरूनच भागवावी लागे. शाळेत आम्हाला प्रा. ना. सी. फडक्यांचा चौरंगी सामन्यातल्या एका क्रिकेट सामन्या-विषयीचा सुंदर लेख आमच्या मराठीच्या पुस्तकात वाचावयास मिळाला होता. त्यात फडक्यांनी दुलीपसिंहजींचे वर्णन अतिशय अप्रतिम केले होते. युद्धकाळात मराठी वृत्तपत्रांतून क्रिकेटविषयक मजकूर मोठ्या प्रमाणात येऊ लागला त्याचे बरेचसे श्रेय क्रिकेट-प्रेमी पत्रकार श्री. र. गो. सरदेसाई यांना दिले पाहिजे. मुंबईच्या 'लोकमान्य' दैनिकात ते क्रिकेटवर अतिशय चुरचुरीत लेख लिहित असत. त्यामुळे क्रिकेटसंबंधी वाङ्.मय वाचण्याची माझी आवड वाढतच गेली. इतके झाले तरी क्रिकेटविषयक ग्रंथ काही माझ्या तेव्हा हाती लागले नाहीत. तो योग जवळजवळ १९५० साली आला.

एकदा गप्पा मारताना माझ्या एका मित्राने, 'ब्रॅडमनने कसोटी सामन्यात एका दिवसात ३०९ धावा केल्या'ची बातमी मला सांगि-तली. ती काही मला खरी वाटेना. म्हणून मी त्याच्याशी पैज घेतली अन् ती मी हरलोही. कारण त्याने सांगितलेली बातमी अगदी खरी होती. खरोखरच ब्रॅडमनने टेस्ट सामन्यात एका दिवसात ३०९ धावा केलेल्या होत्या. क्रिकेटविषयक ग्रंथ वाचण्याची माझी उत्सुकता यामुळे आणखीनच वाढली. मला हिंदी क्रिकेटविषयी बरीच माहिती असली तरी विदेशी क्रिकेटविषयी मी अगदी अंधकारातच होतो. माझ्या ऑफिसमधले माझे एक केनी म्हणून गृहस्थ स्नेही होते. ते मला नेहमी ब्रॅडमन, पॉन्सफोर्ड, मॅकेब, हॉब्स, हॅमंड, जार्डिन, हेडले, कॉन्स्टंटाईन वगैरे परदेशातल्या प्रख्यात क्रिकेटपटूंच्या कर्तृत्वाचे किस्से सांगत. तेव्हा एकदा त्यांना मी मला क्रिकेटविषयक इंग्रजी ग्रंथ वाचावयास कुठे मिळतील असे विचारले. त्यांनी 'टाइम्स ऑफ इंडिया'मधले त्यांचे बंधु एल्. बी. केनी यांच्याकडे मला जाण्यास सांगितले. मी लगोलग तिथे गेलो. येण्याचे कारण ऐकून मला एल् बी. केनी म्हणाले—"आमच्याकडील पुस्तके तुम्हाला बाहेर नेता येणार नाहीत. पण माझ्या ओळखीने तुम्ही ती इथे वाचू शकाल. पुस्तके घरी हवी असतील तर दुसरे एक ग्रंथालय तुम्हाला सुचवितो."

"सांगा" मी म्हटले.

"ब्रेबॉर्न स्टेडीयमवर कांगा क्रिकेट ग्रंथालय आहे. तिथे तुम्ही सभासद व्हा. म्हणजे क्रिकेटविषयक ग्रंथ वाचण्याची तुमची हौस तुम्हाला भागविता येईल" मग मी लागलीच त्या ग्रंथालयाचा सभासद झालो अन् क्रिकेटचे ग्रंथ वाचण्याचा धडाका सुरू केला. ते बहुधा ५४ साल असावे.



## सर्वोच्च धावसंख्या

भारत :–अॅडेलेड येथे (१९४७–४८) ३८१.
कलकत्ता येथे (१९५९–६०) ३३९.
ऑस्ट्रेलिया :–अॅडेलेड येथे (१९४७–४८) ६७४.
मुंबई येथे (१९५६–५७) ७ बाद ५२३.

## धावसंख्येचा नीचांक

भारत : ब्रिस्बेन येथे (१९४७–४८) ५८.
ऑस्ट्रेलिया : कानपूर येथे (१९५९–६०) १०५.

## अत्युच्च धावसंख्या

भारत-ऑस्ट्रेलिया यांच्या दरम्यान आजवर झालेल्या कसोटी सामन्यात दोन्ही डावात मिळून काढलेल्या धावांची अत्युच्च संख्या १३३२ आहे. ह्या धावा ऑस्ट्रेलियाने अॅडेलेड येथील सामन्यात काढलेल्या आहेत.

## दोन्ही डावात शतके

एकाच कसोटी सामन्याच्या दोनही डावात शतके काढण्याचा मान भारतातर्फे श्री. विजय हजारे ह्यांनी १९४७–४८ च्या ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यावर असताना पटकाविला. अॅडेलेड येथील कसोटीत पहिल्या डावात ११६ तर दुसऱ्यात १४५ धावा त्यांनी आपल्या नावावर नोंदविल्या.

ऑस्ट्रेलियातर्फे हा मान श्री. डॉन् ब्रॅडमन् ह्यांच्याकडे जातो. १९४७–४८ मधे भारतीय संघ ऑस्ट्रेलियात दौऱ्यावर असताना मेलबोर्नच्या तिसऱ्या कसोटी सामन्यात त्यांनी पहिल्या डावात १३२ व दुसऱ्या डावात नाबाद १२७ धावा फटकाविल्या होत्या.

## केवळ धावांचे यंत्र नव्हे !

माझ्या हातीं पहिले पुस्तक आले तेच मुळी डॉन ब्रॅडमनचे. त्या पुस्तकाचे नाव आहे 'फेअरवेल टू क्रिकेट.' या ग्रंथावर मी बेहद्द खूष झालो. ते काहीं ब्रॅडमनचे आत्मचरित्र नव्हे; पण त्याच्या क्रिकेट-जीवनाची कथा त्याने अगदीं उत्कृष्टपणे अन् आत्मस्तुती टाळून सांगितली आहे. ब्रॅडमनच्या झंझावती खेळाप्रमाणेच त्याचा हा ग्रंथही गाजला. १९५० सालचा हा ग्रंथ सध्या तरी दुर्मिळ होऊन बसला आहे. आंतरराष्ट्रीय क्रिकेटचा अडीच तपांचा इतिहास त्याने अतिशय सुंदरपणे सांगितला आहे. क्रिकेटमध्ये प्रत्यक्ष भाग घेत असतानाही त्याने क्रिकेटविषयक एक-दोन पुस्तके लिहिली होती अन् एकदा तर त्याला त्याबद्दल दंडही सोसावा लागला होता. पण ती पुस्तके काहीं इतकी गाजली नाहीत. 'फेअरवेल टू क्रिकेट' या ग्रंथाने ब्रॅडमनच्या क्रिकेटविषयक चौरस ज्ञानाची कल्पना जगाला आली.

त्याचा दुसरा ग्रंथ 'दि आर्ट ऑफ क्रिकेट'. हा त्याने १९५८ साली लिहिला. या ग्रंथात क्रिकेटच्या खेळाची परिपूर्ण माहिती देऊन तो कसा खेळावा याविषयीच्या सूचनाही त्याने सचित्र दिल्या आहेत. क्रिकेटची ओळख करून घ्यायची असेल तर उदयोन्मुख क्रिकेट-पटूंनी तो अवश्य वाचला पाहिजे. ब्रॅडमन हा नुसते 'धावांचे यंत्र' नव्हता, तर क्रिकेटचा तो चालता बोलता ज्ञानकोश आहे याची खात्री त्याच्या प्रस्तुत ग्रंथावरून पटते. ज्यांना क्रिकेटची सारी मर्मस्थाने (मला कळतात असा मात्र माझा दावा नाही हं !) कळतात त्यांना ब्रॅडमनच्या या ग्रंथाची मौलिकता पटेल. निवृत्त झाल्यानंतर कसोटी सामन्यांचे वृत्त लिहिण्याचे काम त्याने पत्करले तेव्हा त्याच्या इतके मानधन दुसऱ्या कुणालाही मिळाले नसेल. टेस्ट सामन्यांवर त्याची टीका उत्तम असे. त्यापासून इतरांना शिकण्यासारखे असे. तो कुणाबद्दलही अनुदार उद्गार काढीत नसे. त्याची शैली अगदी साधी असे. पण खेळाच्या तांत्रिक बाबतींतले त्याचे वर्णन अतिशय अचूक असे. एकंदरीत ब्रॅडमन हा माझा पहिला आवडता क्रिकेट समीक्षक समजण्यास काहीच हरकत नाही. अशा या माझ्या आवडत्या समी-क्षकाने मला पत्र लिहिले तेव्हां मला किती आनंद झाला असेल ते सांगण्यास मला शब्दच आठवत नाही !

त्यानंतर गेल्या पंधरा वर्षांत मी क्रिकेटविषयक इंग्रजी ग्रंथ सुमारे ४००-५०० तरी वाचले असतील. त्यातले सगळेच काही मला आवडले असे म्हणता येणार नाही तर त्यातली काहींची पुस्तके माझ्या मनात कायमची ठाण मांडून बसली आहेत. अशांचीच माहिती मी सांगणार आहे. ब्रॅडमनचा एक चरित्रकार जॉनी मॉईज नावाचा ऑस्ट्रेलियन समीक्षक होऊन गेला. त्याने ब्रॅडमनचे चरित्र तर लिहिलेच पण 'सेंच्युरी ऑफ क्रिकेटर्स' हे त्याचे पुस्तक अद्वितीय मानावे लागेल. जगातल्या श्रेष्ठ अशा शंभर क्रिकेटपटूंची व्यक्तिचित्रे त्याने बहारदारपणे रेखाटली आहेत. पुस्तक एकदा हातात घेतले की खाली ठेवण्याची बातच नको. त्याची 'ऑस्ट्रेलियन बॅट्समन' अन् 'ऑस्ट्रेलियन बोलर्स' ही पुस्तके अत्युत्तम आहेत. ब्रॅडमनला मित्र असा कुणी नसे. पण मॉईजला तो आपला मित्र मानी यावरून मॉईजच्या क्रिकेट व्यासंगाची कल्पना येते. हा नभोवाणीवर कसोटी सामन्यांचे वर्णनही करीत असे. आता तो हयात नसला तरी त्याचे ग्रंथ अमर आहेत अन् क्रिकेट समीक्षकात त्याच्याविषयी नेहमी आदराचेच उद्गार निघतात. ब्रॅडमनची मला याद आली की मला मॉईजचीही आठवण झाल्याखेरीज रहात नाही. ब्रॅडमनचा समकालीन, त्याच्याबरोबर खेळलेला व त्याच्यावर सडकून टीका करणारा गाजलेला ऑस्ट्रेलन समीक्षक म्हणजे जॅक फिंगल्टन. याचे नाव प्रथम मी दत्तू फडकर यांच्या तोंडून ऐकले. त्यांचा तो फार आवडता टीकाकार. मीही फिंगल्टनची 'क्रिकेट क्रायसीस', 'ब्राइटली फेड्स दी डॉन' आणि 'मास्टर्स ऑफ क्रिकेट' ही पुस्तके अत्यंत उत्सुकतेने वाचली.





उत्कृष्ट शैली, समर्पक आठवणी नि क्रिकेटचे यथातथ्य ज्ञान हे तीन गुण त्याच्या पुस्तकात विशेष दिसतात. क्रिकेट क्रायसीसमध्ये त्याने ब्रॅडमनच्या बॉडीलाईन प्रकरणावर बराच प्रकाश टाकला आहे तर 'ब्राइटली फेड्स दी डॉन' या पुस्तकात त्याने ब्रॅडमनवर टीकाही केली आहे. त्याने ब्रॅडमनवर प्रसंगोपात बरीच टीका केलेली असली तरी ब्रॅडमनच्या कर्तृत्वाविषयी त्याच्या मनात सदैव आदरच दिसतो. क्रिकेट वाङ्‌मय वाचणाऱ्यांचा हा अगदी प्यारा समीक्षक आहे. रे रॉबिन्सन या ऑस्ट्रेलियन क्रिकेट समीक्षकाचे नाव तर आपण नेहमीच टाइम्समध्ये वाचतो. उत्तम भाषा अन् अचूक माहितीबद्दल याची ख्याती आहे. याचे गाजलेले पुस्तक म्हणजे 'बिटवीन विकेट्स' हे होय. या पुस्तकात त्याने अनेक क्रिकेटपटूंची व्यक्तिचित्रे रंगविलेली आहेत. ब्रॅडमनवर याने अतिशय परखड टीका केलेली आहे. ब्रॅडमनच्या बॉडीलाईन बोलींगच्या बॅटींगसंबंधी याने खवचटपणे लिहिलेय: 'एखाद्या झाडूवाल्याप्रमाणे ब्रॅडमनची बॅट पिचवर त्यावेळी झाडलोट करीत होती' पान्सफोर्ड व मॅकेब या ऑस्ट्रेलियन फलंदाजांची त्याने रंगविलेली व्यक्तिचित्रे अतिशय रमणीय आहेत. लारवूडने गाजविलेल्या बॉडीलाईन गोलंदाजीवर त्याने दोन प्रकरणे लिहिली असून त्यात त्याने ब्रॅडमनवर निर्दयपणे कोरडे ओढले आहेत. 'ईस्टर्न मॅजिक' या प्रकरणात आपल्याकडील रणजी, दुलीपसिंह, पतौडी (मोठे), महंमद निसार, मर्चंट, मुस्ताकअल्ली, हजारे, मनकड, मांजरेकर, अमरनाथ इत्यादी क्रिकेटपटूंचा उल्लेख त्याने न विसरता केला आहे. मनकडचे नाव मुलवंतराय असे तो बिनचूकपणे सांगतो. पंचरंगी सामन्यातल्या हजारे-मर्चंटच्या विक्रमाबद्दलही त्याने प्रांजळपणे लिहिले आहे. भारतीय क्रिकेटविषयी इतक्या बिनचूकपणे लिहिणारा विदेशी क्रिकेट समीक्षक क्वचितच आढळतो म्हणून मला हा फार आवडतो. त्याचे 'बिटविन विकेट्स' पुस्तक मी अनेक वेळा वाचले. त्या पुस्तकाची गोडी इतकी अवीट आहे की ते पुनः पुन्हा वाचावेसे वाटते. क्रिकेट प्रेमिकाने विकत घ्यावे इतके हे पुस्तक अप्रतिम आहे. कीथ मिलर हा देखील माझा आवडता समीक्षक आहे. त्याचे 'क्रिकेट कॅरव्हान' व 'क्रिकेट क्रॉस फायर' हे ग्रंथ नमुनेदार आहेत. ब्रॅडमनवर हा सडकून टीका करताना आढळतो तरी त्याचे ब्रॅडमनच्या घरी मेतकूट जमलेले असते. ज्या ब्रॅडमनवर इंग्लंडच्या लारवूडने निर्दयपणे बॉडीलाईन-बोलींग टाकली तो लारवूडही माझा आवडता ग्रंथकार आहे. 'The Larwood Story' हा आत्मचरित्रपर ग्रंथ त्याने लिहिला असून तो अप्रतिम आहे. गोलंदाज म्हणून लारवूड निर्दय वाटला तरी माणूस म्हणून तो किती कनवाळू आहे त्याची खात्री त्याच्या या आत्मचरित्रावरून येते. ज्या क्रिकेट शौकिनांना ब्रॅडमनच्या बॉडीलाइनचा इतिहास समजून घ्यायचा आहे त्याना लारवूडचे हे आत्मचरित्र म्हणजे मोठेच खाद्य होय.

**कार्डस् : क्रिकेटचा कालिदास**

आणखीही मला बरेच क्रिकेट ग्रंथकार आवडतात. इंग्लंडचा नेव्हिल कार्डस् हा तर क्रिकेट समीक्षकांचा मुकुटमणीच आहे. क्रिकेट-








अनुक्रमणिका

## वैयक्तिक सर्वोच्च धावसंख्या

**भारतातर्फे :**

**श्री. विजय हजारे : दहा डावात ४२९ धावा (ऑस्ट्रेलियात) सरासरी–४७.६६.**

**श्री. नरी कॉन्ट्रॅक्टर : दहा डावात ४३८ धावा (भारतात) सरासरी–४३.८०.**

**ऑस्ट्रेलिया :**

**श्री. डॉन् ब्रॅडमन् : सहा डावात ७१५ धावा (ऑस्ट्रेलियात) सरासरी–१७८.७५.**

**श्री. ओनील : सहा डावात ३७६ धावा (भारतात) सरासरी–६२.६६**

## गोलंदाजी

**एका डावात पन्नासवर षटके ( overs ) टाकण्याची कामगिरी भारतातर्फे श्री. बापू नाडकर्णी ह्यांनी १९५९–६०-मधे मुंबईच्या कसोटी सामन्यात बजाविली. ह्या डावात त्यांनी एकावन्न षटके टाकिली. त्यांपैकी अकरा निर्धाव होती. उरलेल्या षटकात १०५ धावा देऊन त्यांनी सहा बळी मिळविले.**

**ऑस्ट्रेलियातर्फे अशा प्रकारे पन्नासावर षटके श्री. अॅश्ली मॅलेटी ह्यांनी कानपूर येथील कसोटी सामन्यात (१९६९–७०) टाकलेली आहेत. ह्यावेळचे त्यांचे गोलंदाजीचे पृथःकरण असे : ५१.५/३०/५८/३.**

वाङ्‌मयाचा तो कालीदास आहे इतके सांगितले तरी पुरे. पन्नास वर्षे हा क्रिकेट सामने पहातोय. त्यावर त्याने इतके सुंदर वाङ्‌मय लिहून ठेवलेय की आंतरराष्ट्रीय क्रिकेटवरील कुठलाही ग्रंथ पाहिला की त्याच्या नावाची नोंद त्यात कुठेतरी असायचीच. गायन अन् क्रिकेट हे याचे मोठे छंद. क्रिकेटवर तो पन्नास वर्षे सतत लिहीत आलाय. क्रिकेटर्स बुक, डेज इन् दी सन, दी समर गेम, गुड डेज, ऑस्ट्रेलियन समर, इंग्लिश क्रिकेट वगैरे त्याने लिहिलेली सारी क्रिकेटविषयक पुस्तके अतिशय वाचनीय आहेत. एखाद्याच्या बॅटिंगचे वर्णन जिथे अन्य लेखक पानभर करतील तिथे कार्डस् त्याचा सारा आशय एका वाक्यात सांगून जातो. ब्रॅडमनने जेव्हा ३३४ चा कसोटी सामन्यातला विक्रम केला तेव्हा त्याला शारीरिक शीण बिलकूल आला नाही. त्याविषयी कार्डस् एकच वाक्य लिहून गेला की 'इतक्या धावा काढून तो परतला तेव्हा स्नानगृहातूनच तो बाहेर आलाय असं मला वाटलं' त्याचे आत्मचरित्रही मोठे लोभस आहे. क्रिकेटवर लिहिणारे अनेक झाले व पुढेही होतील पण कार्डसूची सर कुणालाच येणार नाही. बी. बी. सी.चा एके काळचा निवेदक व प्रख्यात क्रिकेट समीक्षक जॉन आरलाट हाही शैलीदार लेखक आहे. त्याच्या 'इंडियन समर' या ग्रंथात त्याने १९४६ साली विलायतेस गेलेल्या भारतीय क्रिकेटपटूंची व्यक्तिचित्रे इतकी मनोज्ञ रंगविली आहेत की भारतीय क्रिकेटचा अभिमान असणारा माणूस तो ग्रंथ विकत घेतल्याशिवाय रहाणार नाही. चार्लस फ्राय हा रणजींचा परम मित्र होता. हाही असाच बाका लेखक. त्याचे आत्मचरित्र म्हणजे क्रिकेटची मेजवानीच. इंग्लंडचा अंपायर चेस्टर याचे आत्मवृत्त तर इतके हृदयस्पर्शी आहे की ते वाचून आपले डोळे पाणावतात. लेन हटन, हॅमंड, कॉम्पटन यांनी लिहिलेली आत्मचरित्रेही पुनः पुन्हा वाचावीशी वाटतात. विल फर्ग्युसन हा तर इंग्लंडचा स्कोअरर. पण त्यानेही आपले आत्मचरित्र अगदी फक्कड लिहिलेय. आमच्या विजयानगरमच्या महाराजावर उर्फ 'विझी'वर त्याने केलेली टीका अतिशय मनोरंजक आहे. आंकडेवारीचा कोश लिहिणारा रॉय वेबर क्रिकेट षौकिनांना माहीत नसेल पण क्रिकेटच्या समीक्षकांचे तो मोठेच आदरस्थान होऊन बसलेला आहे. वेस्ट इंडीजचा प्रख्यात क्रिकेटपटु सर लिअरी कॉन्स्टंटाईन हाही लोकप्रिय क्रिकेट समीक्षक आहे. 'क्रिकेट अॅण्ड आय' क्रिकेट क्रॅकर्स, क्रिकेट कार्निव्हल वगैरे त्याचे ग्रंथ नमुनेदार असून त्याच्या क्रिकेटविषयक कामगिरीबद्दल त्याला इंग्लंडने 'सर'की देऊन त्याचा गौरव केला. असे अनेक विदेशी क्रिकेट समीक्षक माझ्या आवडीचे आहेत. ऑस्ट्रेलियाचा अलीकडचा पत्रकार रिची बेनॉही सुरेख लिहिण्याबद्दल प्रसिद्ध आहे. पाश्चिमात्य देशात बरेच क्रिकेटपटू क्रिकेट निवृत्तीनंतर लेखणी हातात घेतात. कुणी आत्मचरित्रे लिहितात तर कुणी पत्रकाराचा पेशा स्वीकारतात. आपल्याकडे ही प्रथा अगदी थोडया प्रमाणात आढळते. आता आपल्याकडील समीक्षकांविषयी सांगून हा लेख संपवूया.

### भारतीय समीक्षक

आपल्याकडील समीक्षकांविषयी विचार करताना मला प्रथम याद येते ती 'टाइम्स ऑफ इंडिया'चा जुना स्पोर्ट संपादक **लाली** याची. याला क्रिकेटमध्ये फारच रस असे. क्रिकेटविषयक सर्व बातम्या तो ठळकपणे देई. विदेशी क्रिकेटच्या बातम्यांचे संकलनही तो उत्कृष्टपणे करीत असे. स्वतः तो थोडे लिही पण लिही ते वाचनीय असे. एकंदरीत ज्याला क्रिकेट सेन्स म्हणतात तो त्याच्यापाशी भरपूर असल्यामुळे टाईम्सचे खेळाचे पान अतिशय वाचनीय होई. ही गोष्ट फार जुनी आहे. त्यावेळी क्रिकेटविषयक मजकुराची तहान इंग्रजी वृत्तपत्रांवरच भागवावी लागे. अन् म्हणून आम्हाला लाली फार आवडायचा. त्याच्या नंतर **तल्यारखानने** तर क्रिकेटची आवड सुशिक्षितांत एवढी भिनवली की इंग्रजी वृत्तपत्रे न वाचणारे क्रिकेट षौकिनही तल्यारखानच्या मताबद्दल उत्सुक असतात. भारतात क्रिकेट कॉमेंट्री लोकप्रिय केली बॉबी तल्यारखाननेच. आता आपल्याकडे रेडियोवर बोलणारे अनेक चांगले क्रिकेट समीक्षक झालेले असले तरी या क्षेत्रात बॉबी तल्यारखानने आपले स्वतंत्र सिंहासन निर्माण केले यात शंकाच नाही. त्याने क्रिकेटवर विपुल लेखन केलेले असून ते सदैव वाचावेसे वाटते इतके आकर्षक असते. इंग्रजी भाषा खरोखरीच त्याच्याकडे पाणी भरतेय. त्याच्या लेखनात पक्षपात असतो, विसंगतीही असते. पण तो काय लिहितो यापेक्षा कसे लिहितो

अनुक्रमणिका

याकडेच सर्वांचे लक्ष असल्याने त्याच्या स्तंभलेखांवर वाचकांच्या उड्या असतात. इतके विपुल लेखन करणाऱ्या तल्यारखानचे एकच पुस्तक उपलब्ध असावे ही गोष्टही गंमतीची आहे. त्याची पत्नी युरोपीयन आहे अन् तिच्यासह तो सी. सी. आय. वरच रहातो. तरुणपणी त्याचा रुबाब वेगळाच असे. आता त्याने दाढी ठेवलेली आहे. जाहीर सभेत त्याच्या क्रिकेटविषयक व्याख्यानांना तुडुंब गर्दी असायची. रणजी करंडक सामन्यांचे वर्णन त्याने जुन्या काळी नभोवाणीवर शैलीदारपणे सांगितल्याने त्या सामन्यांची रंगत अन् लोकप्रियता वाढीस लागली. आमच्याकडील क्रिकेट समीक्षकात तल्यारखानचे स्थान अद्वितीय आहे याबद्दल दुमत नाही अन् नसावेही. बॉबीचा मी डोळस भक्त आहे.

## क्रिकेट जगणारे मर्चंट

विजय मर्चंटनी जसे क्रीडांगण गाजविले त्याप्रमाणे त्यांची लेखणीही लोकप्रिय आहे. त्यांच्यामागे अनेक व्याप असल्याने ते फारच कमी अन् क्वचित लिहितात. पण लिहितात ते उत्तम असते. क्रिकेटचा चालता बोलता ज्ञानकोश अशी त्यांची ख्याती असल्याने अन् प्रो. देवधरांसारखे व्यासंगी क्रिकेटपटूही त्यांच्या क्रिकेट ज्ञानाबद्दल सदैव गौरवपर उद्‌गार काढीत असल्याने त्यांच्याबद्दल आम्हा क्रिकेटविषयक वाचणाऱ्यांच्या अपेक्षा फारच मोठ्या आहेत. किमान त्यानी आपले आत्मचरित्र तरी लिहावे म्हणून अनेकांचा लकडा त्यांच्या मागे असतो. ते स्वतः तर त्याला राजी नाहीतच पण दुसऱ्या कुणीही त्यांचे चरित्र लिहू नये अशी त्यांची इच्छा आहे. त्याना स्वतःला क्रिकेटविषयक वाङ्मय वाचण्याची जबर हौस असे. घरी त्यांनी स्वतःचे एक ग्रंथालयच केले होते. नंतर त्यांनी त्यातली बरीच क्रिकेटची पुस्तके कांगा ग्रंथालयाला भेट म्हणून दिली. नभोवाणीवरही क्रिकेट सामन्यांचे धावते वर्णन करण्यातही त्यांचे वेगळे स्थान उठून दिसते. सामना प्रत्यक्ष पहात असतानाही कित्येक प्रेक्षक मर्चंट यांचे धावते वर्णन मोठ्या उत्सुकतेने ऐकत असतात. मागे ते 'टाईम्स'मध्ये लेखमाला लिहीत असत तेव्हा त्यांचे लेखन क्रिकेटपटूही अतिशय आवडीने वाचीत असत. आपल्या वाणीने आणि लेखणीने आमचा क्रिकेट जिवंत ठेवण्यात मर्चंटनी मोठी कामगिरी बजावलेली आहे. अन् म्हणूनच मी त्यांना माझे आवडते क्रिकेट समीक्षक मानतो. दूरध्वनीवरून जरी एखाद्याने क्रिकेटची शंका त्यांना विचारली तरी शंकेचे निरसन ते तावडतोब करतात. त्यांच्या जीवनात क्रिकेट पुरेपूर भरला असल्यामुळेच मला ते फार प्रिय आहेत. लाला अमरनाथही अलीकडे क्रिकेट समीक्षण करू लागले आहेत. क्रिकेटच्या सर्व शाखांत ते एकेकाळी पारंगत असल्यामुळे कर्णधाराला जी समयज्ञता लागते तीही त्यांनी पूर्वी आत्मसात् केली असल्यामुळे तांत्रिक दृष्टया त्यांची टीका अन् लेखन मननीय असते. त्यांचे 'इंडियन एक्स्प्रेस'मधील समीक्षण वाचण्यास मी नेहमीच उत्सुक असतो. कै. दुलीपसिंहही क्रिकेटवर प्रासंगिक लेखन करीत. ते फार मौलिक असे. १९४७-४८ साली भारतीय संघ ऑस्ट्रेलियाला गेला होता त्यावेळी एका पत्रातर्फे तेही ऑस्ट्रेलियात





क्रीडांगणाप्रमाणेच लेखण्याही गाजविल्या

गेले होते. त्यांनी त्यावेळी भारतीय खेळाडूंवर चरचरीत टीका केली अन् अमरनाथने तिसऱ्या अनुक्रमावर फलंदाजी करण्यास जावे असा धोशा त्यानी ठेवला. त्यांची ती सारी टीका बरोबर होती, पण तेव्हा आमच्या खेळाडूंनी त्याचा अजिबात विचार केला नाही. दुलीपसिंहजींचा क्रिकेटचा व्यासंग वाखाणण्यासारखा असल्याने त्यांनी कुठे काही लिहिलेले समजले की मी मुद्दाम वाचीत असे. अलीकडे 'टाईम्स'चे श्री. प्रभूही सामन्यांचे परीक्षण उत्तम करतात. त्यांची भाषा अतिशय आकर्षक अन् डौलदार आहे. अरविंद लवकरे हा अलीकडचा तरुण महाराष्ट्रीय, उत्तम क्रिकेट समीक्षक असून इंग्रजी भाषेचे तर त्याला अगदी वरदान आहे. इंग्रजी घेऊन एम्. ए. झालेल्या या तरुणाने लहान वयातच क्रिकेटवरती विपुल लेखन केले असून मी ते सर्व मोठ्या आवडीने वाचीत आलो आहे. जुने क्रिकेटपटू मोदी हेही अलीकडे 'टाईम्स'मध्ये लिहीत असत. त्यांच्या लिहिण्यात आग्रह अन् अभिनिवेश असला तरी त्यांचे लेखन माहितीने भरलेले अन् तांत्रिक दृष्ट्या सरस असते. त्यांनी आपल्या आठवणींचे पुस्तक लिहिलेले असून ते अतिशय सुरस उतरले आहे. मद्रासच्या 'हिंदु'चे गुरुनाथनही क्रिकेटविषयक लेखमाला फार चांगल्या लिहीत. क्रिकेटच्या आंकडेवारीचेही ते तज्ञ होते. 'स्पोर्ट ॲण्ड पास्‌ टाईम'मधले त्यांचे लेख मला आवडत.

## मार्च ऑफ इंडियन क्रिकेट

जुने क्रिकेटपटू **प्रो. देवधर** यांचा क्रिकेट व्यासंग जबरदस्त असून त्यांनी या विषयावरती इंग्रजी-मराठीत बरेच लेखन केले आहे. १९४७-४८ सालच्या आस्ट्रेलियाला गेलेल्या भारतीय संघाच्या आस्ट्रेलियाविरुद्ध झालेल्या सामन्यांचे समीक्षण ते कलकत्त्याच्या एका इंग्रजी वृत्तपत्रात करीत असत. त्यासाठी स्वतः ते आस्ट्रेलियाला गेले होते. पुढे लेखमालेत थोडी भर घालून 'मार्च ऑफ इंडियन क्रिकेट' हा त्यांचा सुंदर ग्रंथ प्रसिद्ध झाला. १९४६ सालीही ते विलायतेस गेले होते व तेव्हाही भारतीय संघाचे इंग्लंड विरुद्ध जे सामने झाले त्याचे समीक्षण त्यांनी कलकत्त्याच्या पत्रात केले होते. 'केसरी'तली त्यांची क्रिकेटविषयक लेखमाला गाजली होती. 'क्रिकेट कसे खेळाल' हे त्यांचे पुस्तक इतके उत्तम आहे की ते आज दुर्मिळ होऊन बसलेले आहे. सध्या ते आपले आत्मचरित्र लिहित आहेत. माझ्या ब्रॅडमनविषयीच्या अनेक शंकांना त्यांनी सवमोकळी







# र. गो. सरदेसाई



अगदी नेव्हील कार्डस्‌चा उत्साह

उत्तरे पत्रांनी दिली. कारण त्यांना ब्रॅडमनचा खेळ प्रत्यक्ष पहावयास मिळाला होता. पुण्यास त्यांच्याशी चर्चा करण्याचा योग मला लाभला आहे. त्यांच्या संभाषणात भारतीय क्रिकेटचा जुना इतिहास ऐकावयास मिळतो. तांत्रिक दृष्ट्या मला त्यांचे सारे क्रिकेटविषयक लेखन फारच आवडते. प्रो. ना. सी. फडके हेही माझे आवडते क्रिकेट लेखक आहेत. त्यांच्या क्रिकेटविषयक आठवणींचे पुस्तक अप्रतिम शैलीने नटलेले आहे. त्यांनी इंग्रजीतही क्रिकेटविषयक लेखन केले आहे. पण क्रिकेटवरचे मला त्यांचे मराठी लेखन जास्त आवडते. सी. के. नायडूंच्या वरती त्यांनी लिहिलेले लेख अन् आठवणी अतिशय रंगतदार आहेत. क्रिकेटविषयक मराठी वाङ्मयात त्यांचे वेगळे स्थान आहे यात शंका नाही. **माधव मंत्री** हे जुने क्रिकेटपटूही थोडे पण उत्तम क्रिकेट लेखन करतात. मराठी-इंग्रजीतही त्यांनी लिहिलेले आहे. ते फार थोडे लिहीत असल्याने आपल्याकडे अजून तितकेसे त्यांचे नाव झालेले नाही म्हणून मला नेहमीच विषाद वाटत आला. माझे मित्र श्री. सुधीर वैद्य हे एक तरुण, क्रिकेटचे आकडे तज्ञ आहेत. त्यांचा 'फिगर्स ऑफ क्रिकेट' हा ग्रंथ जगभर गाजला. नुकतेच त्यांनी विनू मनकडचे चरित्र इंग्रजीत लिहून पुरे केले. क्रिकेटविषयक बिनचूक माहिती हे त्यांचे खास वैशिष्टच. माझे आणखी एक क्रिकेट वेडे मित्र आहेत. त्यांचे नाव आनंदजी डोसा. या गुजराती गृहस्थांनी भारतीय क्रिकेटवरती जेवढे म्हणून ग्रंथ आहेत त्यांचा संग्रह केला असून तो मोठा नमुनेदार आहे. क्रिकेट आंकडेवारीविषयी 'टाईम्स'-मध्ये ते कधीकधी लेख लिहितात. मला ते फार आवडतात. त्याप्रमाणेच 'टाईम्स'मध्ये गल्या चाळीस वर्षात भारतीय क्रिकेटविषयी प्रसिद्ध झालेल्या मजकुराच्या कात्रणांचा संग्रह त्यांनी केला आहे. भारतीय क्रिकेटवर कुणी ग्रंथ लिहिणार असला की त्याला डोसांच्या या कात्रणांचा फार उपयोग होतो. त्या लेखकाची जेवण्या-खाण्याची अन् चहाची सोय डोसाच करतात. असे क्रिकेटप्रेम क्वचितच पहावयास मिळते. मराठीतली क्रिकेटवरची सारी पुस्तके त्यांच्या संग्रही आहेत. नभोवाणीवर क्रिकेट सामन्यांचे वर्णन चालू असताना ते समालोचनकारांच्या शेजारीच बसतात अन् आकडेवारीची शंका उपस्थित झाली की त्याचे निरसन ते लागलीच करतात डोसा क्रिकेटविषयक चर्चाही करतात. दुलीपसिंह गौरव ग्रंथाच्या सपादनात त्यांचा सिंहाचा वाटा आहे. अशा अनेक कारणामुळे डोसा हे माझ्या मर्जीतले समीक्षक आहेत.

## अग्रेसर सरदेसाई

मराठीतले प्रख्यात क्रिकेट समीक्षक म्हणजे माझे मित्र **र. गो. सरदेसाई**. गेले तीस वर्षे ते क्रिकेटवर न कंटाळता लिहित आले आहेत. क्रिकेटविषयी त्यांचे वाचन अन् व्यासंग विलक्षण आहे. त्यांचे सारे लेखन मोठे चटकदार तर असतेच शिवाय क्रिकेटविषयक दुर्मिळ माहिती ते आपल्या पोतडीतून काढून वाचकाला देतात तेव्हा आश्चर्य वाटते. त्यांचा 'हिंदी क्रिकेट' हा ग्रंथ अपूर्व आहे. तो आता दुर्मिळ आहे. क्रिकेटसंबंधी आणि भारतीय क्रिकेटविषयीची माहिती त्यात खच्चून भरली आहे. 'लोकमान्य' पत्रात सरदेसायांनी क्रिकेटविषयक विपुल लेखन केले. त्याप्रमाणे 'केसरी', 'नवनीत' वगैरे नियतकालिकात ते लिहीत असतातच. क्रिकेटवर तर ते अधिकारवाणीने लिहितातच पण इतरही विदेशी खेळांवर लिहिण्याविषयी त्यांची मोठी ख्याती आहे. 'खेळांच्या जन्मकथा' हा त्यांचा गाजलेला ग्रंथ आहे. मराठीत क्रिकेट विषय लोकप्रिय करण्यात र. गों. चा वाटा फार मोठा आहे. दत्ता फडकरांसारखे क्रिकेटपटूही त्यांच्या क्रिकेट व्यासंगाबद्दल थक्क होत. नाशिकच्या 'रसरंग'मध्येही त्यांचे साप्ताहिक लेखन, क्रिकेटवरती चालू असते. क्रिकेटविषयक मराठी लेखन वाचणाऱ्या वाचकांना र. गो. सरदेसायांचे नाव सुपरिचित आहे. अगदी नेव्हिल कार्डस्‌च्या उत्साहाने आमचे र. गो. क्रिकेटवर अनेक वर्षे डौलदार क्रिकेट लेखन करीत आले आहेत. रंगा सोहोनी हे वास्तविक क्रिकेटपटू. पण त्यांनी आपल्या ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्याचे वर्णन 'आनंदवन' मासिकात लिहिले ते अविस्मरणीय ठरले. ते लेखन फार करीत नसले तरी ती कला त्याना अवगत आहे. क्रिकेटविषयक गप्पा ते रंगवितात. त्यांच्या त्या एका प्रवास वर्णनामुळे ते माझे आवडते क्रिकेट समीक्षक बनले. पूर्वी केशवराव भोळे क्रिकेटवर फार सुंदर लिहीत. त्यांचे पूर्वग्रह असले तरी त्यांचे लेखन मला आवडे. 'मौजे'त पुरुषोत्तम धासकही पूर्वी क्रिकेटविषयक सदर चालवीत ते मला फार आवडे. याखेरीज सदाशिव पळसुले, वि. ग. कानिटकर, वि. वि. करमरकर, जयंत नेने, शिरीष कणेकर, श्री. कृ. दामले, रो. ल. चिटणीस, प्रा. अविनाश केळकर या नव्या जुन्या क्रिकेट समीक्षकांचे लेखनही मी आवडीने वाचीत आलो आहे. मधु रेगे हे माझे आवडीचे समीक्षक आहेत. 'शैलीदार फलंदाजी' हा त्यांचा ग्रंथ अप्रतिम आहे. जुने खेळाडू पी. विठ्ठल हेही पूर्वी कधीकधी मराठीत लिहीत. त्यांचे लेखन मला फारच आवडे. 'विविध वृत्ता'त त्यांनी सी. के. नायडूंवरील लिहिलेला लेख उत्तम होता. विविधवृत्तात त्यांनी एक लेखमाला लिहिली होती व नंतर त्या लेखांचे पुस्तक निघाले. 'माझे क्रीडाजीवन' हे त्याचे नाव. सध्या हे पुस्तक दुर्मिळ आहे. पण प्रत्येकाने ते ग्रंथालयातून मिळवून तरी वाचावे म्हणजे पी. विठ्ठल यानी आपल्या आठवणी किती खसखुशीतपणे







लिहिल्या आहेत त्याची कल्पना त्यांना येईल.

आजचे आघाडीचे व मराठीत सर्वात विपुल अन् सुरेख लेखन करणारे **बाळ ज. पंडीत** हे तर माझे मित्रच. त्यांच्या उत्साहाबद्दल मला नेहमीच कौतुक वाटते. गेले एक तप न कंटाळता सातत्याने ते खास क्रिकेटवर लिहीत आहेत अन् त्यांनी स्वतःचा वाचकवर्गही निर्माण केला आहे. क्रिकेटच्या तांत्रिक बाबींचे त्यांचे ज्ञान अव्वल दर्जाचे असल्याने ते रेडियोवर मराठीत क्रिकेट मॅचचे वर्णन अस्खलीतपणे नि ओघवती भाषेत करू शकतात. 'पहिले शतक' हा त्यांचा ग्रंथ वाचनीय आहे. त्यांचे सारे लेखन मी वाचीत आलो आहे अन् त्यापासून मला मोठा आनंद लाभत आला आहे. भारतीय संघाच्या १०० कसोटी सामन्यांची कहाणी त्यांनी 'सह्याद्रि'त लिहिली ती प्रत्येकाने वाचण्यासारखी आहे. र. गो. सरदेसायांबरोबरच मराठीत क्रिकेटची लोकप्रियता जागती ठेवण्याचा मान बाळ ज. पंडितानाच द्यावयास हवा.

क्रिकेटविषयक ग्रंथ अनेक वर्षे मी वाचीत आलो. पण आता मला त्याचा अगदी कंटाळा आलाय. या विषयावर लिहायचे नाही असे मी केव्हाच ठरविले आहे. पण माझे मित्र श्री. दलाल मला थोडेच सोडणार आहेत? त्यांची क्रिकेट पुरवणी असली की मग माझ्या मनात आठवणींची गर्दी उसळते. मन ब्रेबॉर्न स्टेडीयमवरील कांगा ग्रंथालयाभोवती घिरट्या घालू लागते. त्या समोरचे अॅंबेसॅडर हॉटेल डोळ्यासमोर उभे रहाते. हात काम करू लागतो अन् त्याचेच फळ म्हणजे बॅडमनपासून ते बाळ पंडितांपर्यंत मला आवडल्या समीक्षकांची ही कहाणी—तिने तुमचा क्रिकेट उत्साह वाढावा या हेतूने साकार केली जाते. तुम्ही पुढेमागे क्रिकेट समीक्षक बनावे म्हणून ! ●●●

[ पान १० वरून—**क्रिकेटवीरांच्या मुलाखती** ]

म्हैसूर येथील पंच येतात. तर कानपूरच्या सामन्यासाठी मुंबई आणि मद्रास येथील पंच नेमतात. म्हणजे पाच सामन्यासाठी वेगवेगळे दहा पंच काम करतात. त्यांच्या ऐवजी दोन किंवा तीन निवडक पंचांकडे ही कामगिरी दिली तर चुका कमी होतील असे मला वाटते."

"मघाशी आपण आपल्या पंचांना परदेशी कर्णधारांची मर्जी राखावी लागते असे म्हणालात याबद्दल एखादे उदाहरण द्याल का? " मी विचारले.

"सांगतो. मुंबईच्या नुकत्याच झालेल्या सामन्यातील प्रसंग आठवा. क्रीडांगणावरील घड्याळाप्रमाणे उपाहाराला दोन मिनिटे अवधी होता. त्यामुळे लॉरीने मॅकेंझीला गोलंदाजीसाठी बोलाविले; परंतु पंचाच्या खिशातील घड्याळाप्रमाणे वेळ झालेला होता. पंचाने हे लॉरीला सांगताच त्याने आपली टोपी रागाने जमिनीवर फेकली. सर्व खेळाडू तंबूत परतले. शेवटी आमच्या पंचालाच ती टोपी स्वतः उचलून द्यावी लागली. यात पंचाची प्रतिष्ठा कुठे राहिली ?"

## परदेशी संघानाच फायदेशीर

"परवा व्यंकटराघवनला संशयास्पद रीतीने बाद देण्यात आले. असा आणखी एखादा प्रसंग तुम्हांला आठवतो काय ?"

"सांगतो. बरोबर अकरा वर्षापूर्वी (१९५८) वेस्ट इंडीजचा संघ भारतात आला होता. त्यावेळचा कानपूरचा कसोटी सामना आठवा. वेस्ट इंडीज खेळत होते. त्यांचे हंट आणि होल्ट एकही धाव न करता बाद झाले. कन्हायने उम्रीगरच्या गोलंदाजीवर स्लिपमध्ये झेल दिला. रामचंदने तो सोडला. पुन्हा रामचंदच्या पुढच्याच षटकात गॅरी सोबर्स रामचंदच्या गोलंदाजीवर निर्विवाद पायचीत होता. त्यावेळी त्याने भोपळाही फोडलेला नव्हता. आमच्या पंचाने अपील फेटाळले. सोबर्सने सुमारे १८० धावसंख्या रचली. आपला पराभव झाला. आता पंचाने हा निकाल कां दिला याचे कारण तुम्हाला समजेल. पंचांच्या हातून चुका ह्या होणारच. परंतु आश्चर्य असे की त्याचा फायदा मिळतो तो परकीय संघाना—आपल्या संघाला नाही," श्री. हर्डीकर आपला मुद्दा ठामपणे मांडीत म्हणाले.

## निवड-समितीचा हलगर्जीपणा

आजच्या भारतीय निवड समितीच्या धरसोड धोरणावर आपले टीकास्त्र सोडीत ते पुढे म्हणाले, "कसोटी संघ निवडताना प्रादेशिकता, खेळाडूचे वय किंवा इतर बाबी पाहाता त्याची गुणवत्ताच पाहावी. मी तर असे म्हणेन की तिशी उलटल्यानंतरच कोणताही क्रिकेटपटू आपले कसब पूर्णतया प्रकट करू शकतो. मग बोर्डे, जयसिंहा, सरदेसाई यांनी एका सामन्यात पुरेशा धावा काढल्या नाहीत म्हणून तुम्ही त्यांची कायम हकालपट्टी करता. यात या ज्येष्ठ खेळाडूंची मानहानी नाही काय ? जगातील श्रेष्ठ क्रिकेटपटूंचे रेकॉर्डस् तपासून पाहा. त्यांनी आपल्या वयाची तिशी उलटल्यावरच धावांचे डोंगर रचले आहेत."

"मग तरुणांना संधी कधी मिळणार ?" मी मध्येच विचारले.

"असे पाहा, कसोटी सामना म्हणजे राष्ट्राची इभ्रत पणाला लागते. तिथे तुम्ही प्रयोग कसले करता? इतर सामने असतात त्यात त्यांना खेळवा. सतत दोन वर्षे सातत्याने ते खेळूद्यात. त्याने लायकी सिद्ध केली की त्याला कसोटीत घ्या. परंतु रणजी करंडक सामन्यात किंवा इतर महत्त्वाच्या सामन्यात ज्याने एकही शतक काढलेले नाही, ज्याने सातत्याने धावा काढल्या नाहीत त्याला कसोटी सामन्यात फलंदाज म्हणून कसे घेता येईल ? विश्वनाथ या तरुणाचा ज्याने खेळ एकदा पाहिला तो तात्काळ सांगेल की हा कसोटी लायक खेळाडू आहे. मग त्याची निवड न्यूझीलंडबरोबर यापूर्वीच कां झाली नाही ?"

"याची कारणे कोणती ?"

"त्याचे असे आहे की निवड समितीने यापूर्वी त्याचा खेळच पाहिलेला नव्हता असे मला स्पष्टपणे सांगावेसे वाटते. परवा जयपूरला ऑस्ट्रेलियाशी मध्य विभागाचा एक सामना झाला. निवड-समितीचे किती सदस्य उपस्थित होते ? स्वतः अध्यक्ष विजय मर्चंट हे उपस्थित राहिले का ?"

[ पान ५८ वर पहा ]




# ठोकर

प्रकाशचंद्र देशपांडे

मी सारखा हॉर्न वाजवून कंटाळून गेलो. माझ्या ट्रकच्या पुढे ठासून भरलेला मर्सिडिज ट्रक सूंसाट धावत होता. ट्रक ड्रायव्हर टाररोडच्या खाली गाडी घ्यायला जणू तयार नव्हता. मला अजिबात साईड मिळत नव्हती. पाठोपाठ गाडी चालविण्याचा मला कंटाळा आला होता. शिरवळ सोडल्यापासून जवळजवळ ही शर्यत चालू होती. माझा क्लिनर लछमनी चिडला होता. बसल्या बसल्या तो त्याला अपशब्द मोजत सिगारेटचा धूर काढीत होता.

समोरच्या गाडीच्या मागच्या फाळक्यावर लिहिलेली अक्षरे मला स्पष्ट दिसत होती. 'सतगुरु तेरी ओट'. गाडी शिख ड्रायव्हरची होती. ह्या अक्षरांचा अर्थही मला समजत नव्हता, पण मला पुढं जायला रस्ता मिळत नसल्यामुळे पुन: पुन: ती अक्षरे डोळ्यांसमोर नाचत होती. पाठोपाठ गाडी चालविण्याशिवाय गत्यंतर नव्हते. मला तर जलदीने कोल्हापूर गाठून रेडिओच्या पेटयांची डिलीव्हरी सायंकाळच्या आत दुसऱ्या गाडीला द्यायची होती.

मी कावून गेलो. ट्रक रस्त्याच्या कडेला घेवून मी सारखा हॉर्न वाजविण्याचा सपाटा चालवला. आता कुठे त्या शिख ड्रायव्हरच्या कानाचा पडदा हलला असावा! त्याने आपली गाडी बाजूला घेतली तरी मला रस्ता क्लिअर मिळाला नव्हता. मी ॲक्सलेटर जोराने दाबून रस्त्याच्या कडेला गाडी घेऊन जोराने मुसंडी मारली नि माझा ट्रक पुढे काढला. ट्रकच्या ताडपत्रीवर कडेच्या झाडाच्या फांद्या वाजल्या नि मर्सिडिजच्या बंपरला जणू माझ्या ट्रकची मागची बाजू घासली. गाडी पुढे घेताना मी पाहिले. त्या ट्रकमध्ये पुढच्या बाजूला तीन दाण्डगे शीख बसले होते. एक देखणा शीख गाडी चालवित होता. अगदी धीमेपणाने!

मागच्या गाडीला चांगलीच ठोकर बसली असावी कारण मला साईडमिररमध्य शीखांनी त्यांची गाडी थांबविल्याचे दिसले. त्यांच्या गाडीची परिस्थिती खाली उतरून पहाणे मूर्खपणाचे होते. साईड मिळाली नसताना मी माझी गाडी पुढे घेण्याचा प्रयत्न केला होता. दुसरं म्हणजे ते दांडगेश्वर शिख! ह्या परिस्थितीत त्यांनी माझे नि लछमनचे कंबरडेच मोडले असते. मी जरी पैलवान असलो तरी लछमन किरकोळ होता. त्या तिघांनी आमच्या दोघांचे तीनतेरा केले असते. माझ्या दृष्टीने शहाणपणाचा एकच मार्ग होता नि तो म्हणजे ट्रक घेऊन पळून जाण्याचा! तेच मी केले. खंबाटकी घाट लागला होता. तो उतरल्यावर खण्डाळा गाव होते. माझंच गाव! मारामारी करायचा प्रसंग आला असता तर तालीमच उठवली असती!

लछमन मी गाडी पुढं काढल्यामुळे खुलला असला तरी परिस्थितीची जाणीव त्याला होती. सारखा मागे वळून पहात तो मला सूचना करीत होता. मी सफाईने घाटाची वळणे चढत होतो नि वेगाने रस्ता कापीत होतो. बाजूच्या आरशामध्ये मागची गाडी पहात होतो. दोन तीन वळणे सोडून ती गाडी येत असलेली मला दिसत होती. भरधाव वेगाने तो शिख ड्रायव्हर आमची गाडी गाठण्याचा प्रयत्न करीत होता. मी गिअर बदलला. ॲक्सलेटरवर जोराने पाय दाबला. भुंग्यांच्या आवाजासारखा ताल धरीत माझा ट्रक वाऱ्याच्या वेगाने पळू लागला. उताराची वळणे लागली होती. समोरून येणाऱ्या गाड्यांना साईड देत देत मला घाट उतरावा लागत होता. वेग कमी जास्त होत होता नि मागची मर्सीडिज झपाट्याने अंतर तोडीत होती. तसं पाहिलं तर शर्यत लावली असता मागची गाडी माझ्या गाडीपेक्षा अधिक वेगवान होती नि नवीकोरी दिसत होती.

उताराची वळणे सरून सरळ रस्ता लागला. धुळीचे ढग मागच्या बाजूला बनवत टायरनी वेग घेतला. साईडमिररमध्ये मी डोकावले. अरे बापरे! केवळ अर्ध्या फर्लांगाच्या अंतरातून मागची गाडी येत होती. क्षणाक्षणाला दोन गाड्यांमधील अन्तर कमी होत होते. शीख ड्रायव्हर खिडकीतून बाहेर पहात ड्रायव्हिंग करत होता नि मला गाडी थांबविण्याच्या खुणा करीत होता.

लछमनला मी इशारा केला. आमची कंबक्तीच भरली होती. खंडाळा जवळ यायच्या आतच त्यांनी आम्हाला गाठले होते. तरी शेवटचा प्रयत्न म्हणून मी माझ्या ट्रकला ज्यादा वेग दिला पण मागची गाडी पाठ सोडत नव्हती. आता तर मागून सारखा हॉर्नचा आवाज येत होता. मी साईड न देता स्टिअरींग सरळ ठवून ट्रक दामटीत होतो.

दोन तीन क्षणातच माझ्या गाडीच्या बरोबरीने मर्सिडीज धावू लागली. दोन शीख माझ्याकडे पाहून हंसत होते. ट्रक थांबवायला सांगत होते शिख ड्रायव्हरने जोराने त्याची गाडी पुढे काढून रस्त्यात आडवी उभी केली. रस्ताच बंद झाला होता. अपघात टाळण्यासाठी करकचून ब्रेक दाबून मी माझा ट्रक उभा केला नि लछमनला म्हटले, "आलिया भोगासी..."

घामाने मी पुरता निथळला होतो. पुढे काय होणार हे मला माहीत होते. दार न उघडताच मी बसून राहिलो. ते तीन शीख खाली उतरून आमच्याकडे यत होते. ड्रायव्हरच्या हातात स्पॅनरऐवजी एक माळ होती नि तोंडाने पुटपुटत काहीतरी जप करीत होता. त्याचा चेहेरा मात्र रागीटच होता. तो उद्गारला, "क्यों जिंदगी कितनी सस्ती है भाय? इतनी तेजीसे गाडी चलाते हो!"

त्याच्या बोलण्यात राग नि उपरोध होता. काही न बोलताच मी बसून राहिलो. दुसरा शिख बोलला, "जरा नीचे तो आवो बेटा! तुमको कुछ दिखां दूँ!"

निश्चितपणे हे आव्हान होते. लछमनची तर बोबडीच वळली होती. काय बोलावे हेच मला कळना. काहीतरी बोलले अगर केले पाहिजे होते. तत्काळ! ..काही व्हायच्या आतच माझ्या बाजूने दार उघडले गले. त्या दांडग्या ड्रायव्हरने मला खाली उतरावयास लावले. ते तीघ होते नि मी एकटा होतो. लछमन तर आतच होता. प्रतिकार करूनही काही उपयोग नव्हता. दोन क्षण गले, तीन...

[ पान ५५ वर पहा ]









# विनू मन्कडची वेगळीच व्यक्तिरेखा

आपल्याकडील चरित्र वाङमयाची शाखा दिवसेंदिवस फोफावत चालली असली तरी इंग्रजीत चरित्र लेखन करणारे ग्रंथकार आपल्या महाराष्ट्रात फारच कमी आहेत, आणि आहेत ते बव्हंशी राजकीय पुढाऱ्यांची चरित्रे लिहिणारेच आढळतात. तशात क्रीडापटूंची चरित्रे मराठीत लिहिणारे तर आपल्याकडे बोटावर मोजणारे लेखकच दिसतील. परप्रांतीय ग्रंथकारही इंग्रजीत क्रीडापटूंची चरित्रे रंगविणारे प्रायः दुर्मिळ असताना एका महाराष्ट्रीय तरुणाने प्रख्यात क्रिकेटपटू विनू मनकड यांचे चरित्र इंग्रजीत लिहावे ही बाब कौतुकाचीच म्हटली पाहिजे. हा तरुण अवघा एकतीस वर्षाचा आहे. त्याची नोकरी देखील कारखान्यात आहे. पण त्याला क्रिकेटचे अमाप वेड असल्याने त्याने परिश्रमपूर्वक माहिती मिळवून विनू मनकडचे सुंदर चरित्र इंग्रजीत लिहून पुरे केले. श्री. **सुधीर वैद्य** हे त्या तरुणाचे नाव.

वैद्यांचे हे काही पहिलेच पुस्तक नव्हे ! आठ वर्षांपूर्वी त्यांनी 'फिगर्स ऑफ क्रिकेट' हा क्रिकेटमधल्या आकडेवारीची मनोरंजक माहिती कथन करणारा सुरेख ग्रंथ लिहिला होता. या ग्रंथाचा खास उल्लेख बी. बी. सी. वर करण्यात आला होता अन् आपल्याकडील प्रथितयश क्रिकेट टीकाकारांनीही या पुस्तकाची प्रशंसा प्रांजळपणे केली होती. अशा तऱ्हेचे क्रिकेटमधल्या विविध माहितीने नटलेले पुस्तक परदेशातही सापडत नाही असा निर्वाळा अनेकांनी दिला होता. या शाबासकीने वैद्यांना स्फुरण चढले अन् मग बालपणापासून त्यांचे आराध्यदैवत असलेल्या विनू मनकडचे चरित्र त्यांनी लिहून पुरे केले. मनकड यांच्या क्रिकेट पराक्रमाविषयी बरीच माहिती विखुरलेली होती. ती परिश्रमाने मिळवून तिचे संकलन तर त्यांनी उत्तम प्रकारे केलेच, शिवाय मनकड यांच्या मित्रांकडून त्यांनी 'विनू'संबंधी विपुल माहिती गोळा केली. मनकड यांचा स्वभाव कमालीचा भिडस्त अन् अबोल. तरीही वैद्य त्यांच्या घरी जाऊन त्यांना अनेकदा भेटले, त्यांच्या अनेक मुलाखती घेतल्या, त्यांच्या कुटुंबियांकडूनही विविध प्रकारची माहिती त्यांनी गोळा केली आणि मग या सर्व सामुग्रीचा उपयोग करून त्यांनी आपले प्रस्तुतचे चरित्र सजविले. प्रख्यात फलंदाज श्री. विजय मर्चंट हे मनकड यांचे परममित्र असल्याने त्यांनी अनेक प्रकारची माहिती वैद्यांना पुरविली एवढेच नव्हे तर आपल्या निकट स्नेह्याच्या चरित्रासाठी त्यांनी अप्रतिम प्रस्तावनाही त्यांना लिहून दिली. मनकड यांची सारी क्रिकेट कारकीर्द मर्चंटना अगदी जवळून पहाण्यास मिळाल्यामुळे अन् उभयतांचे संबंधही विलक्षण सौहार्दाचे असल्याने त्यांची प्रस्तावना हेही या चरित्राचे एक भूषण मानावे लागेल. या सगळ्या बड्या क्रिकेटपटूंना गाठून एखाद्या मधमाशीच्या चिकाटीने मनकड यांच्या चरित्रविषयक माहितीचा मध वैद्यांनी गोळा केला असल्याने हे चरित्र मोठे मधुर अन् मनोरंजक उतरले आहे. श्री. रंगा सोहोनी हेही मनकड यांचे निकट स्नेही. विलायतेत लीग क्रिकेटमध्ये खेळत असताना त्याना अनेकदा मनकड यांच्या घरी दहीभात कसा मिळे वगैरे घरगुती आठवणी त्यांनी वैद्यांना दिल्यामुळे चरित्राची मनोरंजकता वाढली आहे अन् त्यातल्या अशा प्रकारच्या आठवणी वाचताना आपल्याला एक आगळा आनंद लुटता यतो. प्रस्तावनत मर्चंट यांनी सांगितलेल्या आठवणीही अशा गोड असून चरित्र वाचताना त्या मनात रेंगाळतात. मनकड यांचा ऑस्ट्रेलियातला पराक्रम सांगताना मर्चंट लिहितात, 'ऑस्ट्रेलियात मिलर-लिंडवॉल या प्रसिद्ध द्रुतगती तोफखान्याला तोंड देऊन त्यांनी कसोटी सामन्यात दोन शतके काढण्याचा जो पराक्रम केला तसा करण्याची संधी जर मला मिळती तर मीही धन्य झालो असतो.' त्यांनी केलेली या चरित्राच्या उपयुक्ततेची प्रशंसा पाहिली की मग चरित्र वाचून पुरे केल्याविाय रहावत नाही.

वैयक्तिक पराक्रमापेक्षा विनू मनकडचे सारे लक्ष संघाची शान वाढविण्याकडेच सदैव कसे लागलेले असे त्याची हकिगत वैद्य आवर्जून सांगतात. 'सॅल्यूट टू मनकड' हे पहिले प्रकरण तसे छोटे असले तरी गुणांनी खास मोठे आहे. सी. के. नायडू, अमरसिंग, निसार, मर्चंट, हजारे, सुभाष गुप्ते, अमरनाथ, मांजरेकर वगैरे मनकड यांच्या समकालीन क्रिकेटपटूंचा गौरवही वैद्य मोठ्या चतुरपणे करतात. २३ कसोटी सामन्यात हजार धावा व १०० बळी घेणारा क्रिकेटपटू अशी मनकड यांची ओळख सलामीलाच ते करून देत असल्याने पुढील प्रकरणांविषयी तरुण वाचकांना नक्कीच उत्सुकता लागेल. मनकड यांना केलेल्या पहिल्या मुजऱ्यातच वैद्य पुस्तकाच्या मनोरंजकतेचा पडताळा देतात. मनकड यांचे मार्गदर्शक प्रिन्स दुलीपसिंह होते एवढेच नव्हे तर त्यांनी विनूला बॅट कशी धरावी याचे धडेही कसे दिले त्याचे दर्शन वैद्यांनी उत्कृष्टपणे घडविले आहे. मनकडना 'विनू' हे नाव कसे पडले त्याची आठवण इतकी विस्मयकारक आहे की अनेक वाचकांना ती अगदी नवीन अन् मौजची वाटल. त्यांचे वडील हिंमतलाल दुलपजी हे पेशाने डॉक्टर होते हीदेखील

## कसोटी सामन्यात २०० हून जास्त बळी

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **परेडी ट्रुमन** | (इंग्लंड) | ६७ | कसोटी सामन्यात | ३०७ | बळी |
| **ब्रायन स्टॅथम** | (इंग्लंड) | ७० | | २५२ | |
| **रिची बेनॉ** | (ऑस्ट्रेलिया) | ६३ | | २४८ | |
| **अलेक बेडसर** | (इंग्लंड) | ५१ | | २३६ | |
| **रे लिंडवॉल** | (ऑस्ट्रेलिया) | ६१ | | २२८ | |
| **क्लेरी ग्रिमेट** | (ऑस्ट्रेलिया) | ३७ | | २१६ | |
| **ग्रॅहॅम मॅकेंझी** | (ऑस्ट्रेलिया) | ४९ | | २१७ | |

माहिती नवीन आहे. विनू मनकड क्रिकेट-क्षेत्रात पुढे कसे आले त्याचा जणू मनोरम चित्रपटच वैद्यांनी वाचकांना तिसऱ्या प्रकरणात दाखविलाय. १९४६ साली पहिल्याच विलायतच्या दौऱ्यात विनूने केलेला पराक्रम मोठा नेत्रदीपक ठरला. त्या सफरीत त्यांनी १०० बळी व हजार धावा केल्या व त्या पराक्रमाचा गौरव म्हणून १९४७ च्या 'विस्डेन' वार्षिकाने आपल्या क्रिकेटपटूंच्या पंचायतनात त्यांचा समावेश कसा केला वगैरे माहिती वैद्यांनी विनचूक दिली आहे. १९४६ चा दौरा हा मनकड यांच्या पराक्रमाची नांदी होती व १९५२ साली विलायतेत कर्तृत्वाचे शिखर गाठून त्यांनी यशाचे भरतवाक्य म्हटले अशा तऱ्हेचा या प्रकरणाचा समारोप करण्यात वैद्यांनी मोठीच मार्मिकता अन् औचित्य दाखविले आहे.

१९४७-४८ साली विनू मनकडनी ऑस्ट्रेलियाचा दौराही इतका गाजविला की ब्रॅडमनने खूष होऊन त्यांना स्वतःचे छायाचित्र भेट म्हणून दिले. या विषयीचे प्रकरणही वैद्यांनी उत्तम रंगविले आहे खरे, पण त्यात एक गोष्ट मात्र खटकते. हे प्रकरण लिहिताना त्यांनी श्रीरंग सोहोनीना आपले ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्याचे जे अनुभव लिहिले आहेत त्याचा उपयोग केलेला दिसत नाही. तसा तो केला असता तर हे ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्याचे प्रकरण आहे त्याहून अधिक रंगतदार झाले असते. मुंबईला पाकिस्तान विरुद्ध कसोटी सामन्यात खेळून मनकडनी १०० वा बळी घेतला त्याच्या सुरम्य आठवणीही वैद्यांनी जशा सांगितल्या आहेत त्याप्रमाणे १९५२ च्या विनूच्या विलायतेतल्या विक्रमांचेही त्यांनी यथातथ्य दर्शन घडविले आहे. विनूने कसोटी सामन्यात पहिली विकेट घेतली तेव्हा हजारे यांनीच झेल टिपला होता अन् मुंबईला पाकिस्तानच्या वकार हुसेनची विकेट घेऊन त्यांनी टेस्टमधला १०० वा बळी घेतला तेव्हाही वकारचा झेल हजारेनीच घेतला अशी गंमतीची माहितीही वैद्य देतात तेव्हा गंमत वाटते.

संघनायक म्हणून मनकड कसे अपयशी ठरले त्याचा निर्देशही वैद्यांनी निःपक्षपातीपणे केला आहे. विनू मनकड यांचे खाजगी जीवन, त्यांचे आवडते मित्र व क्रिकेटपटू, त्यांचे छंद, मित्रांना जेवू घालण्याची त्यांची हौस वगैरे सांगितलेल्या गोष्टींमुळे ग्रंथाची खुमारी फारच वाढली आहे. मनकड सिगरेटही ओढीत नाहीत ही गोष्ट उल्लेखनीय ठरावी. विपुल माहितीने भरलेले अन् ओघवती इंग्रजी शैलीने नटलेले हे चरित्र वैद्यांच्या कीर्तीत निश्चित भर घालील याविषयी खात्री वाटते.

—**अरविंद ताटके**

[**विनू मन्कड**. लेखक **सुधीर वैद्य**, प्रकाशक थॅकर अॅण्ड कं. मुं. १, मूल्य : ६.५० रु. पृष्ठ १५९.]

### अशी आंधळी भक्ती नको

श्री. स. कृ. जोशी हे सातत्याने संतांवर लिखाण करीत आहेत. **फळसाची चमक** या पुस्तकात त्यांनी शिल्लक उरलेल्या काही संतांना आपल्या ललितमधुर भाषेचे स्नान घातलेले आहे. संत संपल्यामुळेच जणु काय त्यांनी वृंदावनीची राधा गवळण, मुंबईचे एक थोर कीर्तनकार इत्यादींनाही या ग्रंथात जागा दिलेली आहे. आता काळ पालटला याची जाणीव वस्तुतः त्यांच्या या कीर्तनकार चरित्र नायकाने त्यांना करून दिलेली आहे. ती जाणीव म्हणजे कीर्तनात जिथे तेवीसशे रुपयांची विदागी मिळे तिथे आता आरतीत पाच पैसे पडतात ही होय. या जाणीवेचा प्रत्यय श्री. जोशी यांना आलेला नसावा असे दिसते. कारण ते म्हणतात की 'संत चरित्रांवरील नवीन लिखाणाचे स्वागत उत्साहाने होत आहे.'

संतविषयक वाङ्मयाचे स्वागत उत्साहाने होत आहे अशा परिस्थितीत श्री. जोशी जर संतांच्या भाटाची हरदासी भूमिका सोडून विधायक टीकाकाराची भूमिका घेतील तर संतांचे व श्री. जोशी यांच्या वाचकांचेही अधिक कल्याण होईल. कारण संतांच्या काव्याची माधुरी जशी अवीट आहे, त्यांची योग्यता जशी थोर आहे तशीच श्री. जोशी यांच्या भाषेची माधुरी अवीट आहे, त्यांचा संत वाङ्मयाचा अभ्यासही थोर आहे. अध्यात्माचे निरुपण करण्यासाठी एक स्त्री आणि एक पुरुष यांच्या मधुर मीलनाचे वर्णन करणे अटळ असेल तर ते मीलन एक पती व एक पत्नी यांचे करावयास कोणी हात बांधत नाही. तो पुरुष कृष्णच हवा असेल तर ती स्त्री रुक्मिणी वर्णन करावयासही क्षम्यतेच्या मर्यादेत मान्यता देता येईल. पण मधुरा भक्तीच्या नांवाखाली राधाकृष्णांचे वाह्यात चाळे वर्णन करून अध्यात्माची मांदुस पिकते हा श्री. जोशी यांचा भ्रम आहे. श्री. जोशी यांना याची थोडी जाणीव आहेच. पण ते साळसूदपणे संतांच्या दोषांचे खापर वाचकांच्या कपाळावर फोडून मोकळे होतात.

संतांच्या प्रत्येक शब्दाचे आंधळे कौतुक करण्यात रस नाही. जो संत एका श्वासात स्त्रीचे वर्णन "मला मूत्राचा पिंड, मेकुड, थेंबुड, शेंबुड, विड बिड लाल थुंका, प्रत्यक्ष किडे, विटाळाचा गाळ," इत्यादी श्री. जोशांच्या म्हणण्याप्रमाणे भडभडा ओकारी येण्याजोगे करतो, तोच संत दुसऱ्या

श्वासात अशाच एका 'विटाळाचा गाळ' गोपीशी कृष्णाचा शृंगार दाखवू लागला की त्या संताला झालेले साक्षात्कार आणि प्रत्यय तपासून घ्यावयास हवेत. स्त्रीच्या कुशीत ज्याचा जन्म झाला तो स्त्रीचे असे वर्णन कसे करू शकतो ? अध्यात्माचा गड्डा जो उपनिपदे त्यात कुठे स्त्रियांचे असे वर्णन केलेले आहे ? योगाची ज्याला तृणमात्र कल्पना आहे, ईश्वर ज्याला हवा आहे असा कोणता योगी जगन्माऊली स्त्रीचे असे वर्णन करतो ? विवेकानंदांकडे जेव्हा स्त्रीने याचना केली तेव्हा ते काय असे बेताल वडवडले ? जे संत पूर्व रात्री असली स्त्रियांची वर्णने करीत आणि उत्तर रात्री स्त्रियांशी संसार करून प्रजा निर्मित, त्यांच्या वाङमयाकडे अधिक डोळसपणे पहावयास हवे.

तेरावे ते अठरावे शतक महाराष्ट्राच्या इतिहासात सुवर्णाक्षराने लिहिण्याजोगे असे ते म्हणतात. ज्या संतांमुळे या शतकांचे सोने झाले त्यांनी एकोणीसाव्या शतकात झालेली महाराष्ट्राची विटंवना टाळण्यासाठी कोणता द्रष्टेपणा दाखविला? आधुनिक थोर क्रांतिकारकांनी जो कर्मयोग आचरला त्याचे किती श्रेय संतांना द्यावयाचे आणि किती वाघिणीच्या दुधातून आलेल्या 'राष्ट्र' या कल्पनेस द्यावयाचे याचा निर्णय श्री. जोशी कसा करणार ? नामदेव आणि रामदास हे दोघेही थोर खरेच; पण त्यांची थोरवी काय एकाच मापाने मोजण्याजोगी आहे ? सर्वच संतांना टाळ कुटे म्हणणे हे जितके एकांतिक टोक आहे तितकेच सर्वच संतांना परब्रह्म मानणे हेही एकांतिक आहे हे श्री. जोशी जाणतील तर भावी कालावर त्यांचे फार उपकार होतील.

—उषाकांत

(**कळसाची चमक** —ले. श्री. स. कृ. जोशी. प्रकाशक: वोरा आणि कंपनी, किंमत रु. दोन)

## नगाधिराज हिमालय

या छोट्या पुस्तकात डॉ. वाटवे यांनी ऋग्वेदाच्या कालापासून तो तहत् वाणभट्टाच्या काळापर्यंतच्या संस्कृत वाङमयात हिमालयासंबंधी जे उल्लेख आलेले आहेत ते एकत्रित केले आहेत. आरंभी आरंभी नुसते उतारे आणि भाषांतर असे स्वरुप असले तरी कालिदासाकडे येताच डॉक्टर महाशय पुरते रंगून गेलेले आहेत. कालिदासाला पुस्तकातील जवळजवळ निम्मे भाग मिळालेला आहे. प्रसंगी डॉक्टर महाशय हिमालयाला विसरून कालिदासाच्या कीर्तनात रंगले आहेत असे वाटते. ग्रंथाने डॉक्टरसाहेबांच्या कीर्तीत भर पडली आहे त्यापेक्षा अधिक डॉक्टर साहेबांच्या नांवाने ग्रंथाला शोभा आलेली आहे.

—उषाकांत

[ले. डॉ. **के. ना. वाटवे**. प्रकाशक वोरा आणि कंपनी. (६४) मूल्य रु. १-२५].

## वेदनेच्या कातळाचे पाझर

सहज सूचक पण नाजुक आणि सूक्ष्म विणीची कविता लिहिणाऱ्या म. म. देशपांडे यांचा हा पहिला कवितासंग्रह. पंधराएक वर्षे शांतपणे पण सातत्याने ते लिहीत आहेत. कविता लिहिण्याची ही ओढ 'छातीवर दगड जरी ठेवला तरी ही हिरवी पाने कुठून फुटतात कळत नाही' ह्या संग्रहातील पहिल्याच कवितेत प्रकट झाली आहे.

हुरहूर लावणाऱ्या, उथळपणा वा भडकपणा नसणाऱ्या, भावांची हळुवार चित्रणे त्यांच्या कवितेतून आली आहेत.

'क्षणाक्षणाने दाटतो काळोख
जुनी एखादी
मनात सारखी घोळते ओळख.'
'संध्याकाळ होती तेव्हा
साधी भोळी परकरी
आज कातर वेळेला
एकटे वाटते घरी.'

अशा संध्याकाळच्या एकटेपणाला अधिक अर्थ देणाऱ्या ओळी वाचकाला उदास करून सोडतात.

त्यांच्या काही कवितांचा एकमेकांशी संबंध असावा असे उगीचच वाटत राहते. 'उदास' 'रिता' 'सांज' ह्या कविता वाचल्यावर 'अजून काय झालं' ही कविता वाचावी आणि नंतर 'इवला स्वेटर विणताना'. म्हणजे ह्या सर्व कवितातून हलक्या चाहुलीने 'कुणीतरी' जाणवून जाते. एखादे सुंदर स्वप्न डोळ्यापुढून सरकावे आणि जाग येऊन हुरहूर वाटावी तसे होते.

'दुपार', 'संध्याकाळ', 'सांज', 'पळसवन' 'हुशार' कवितांतून निसर्गाचे रंग अधिक आले आहेत परंतु त्या केवळ निसर्गचित्रण करणाऱ्या कविता नसून त्यायोगे विशिष्ट भाववृत्तींचे रेखन केले आहे.

असो, भाववृत्तींना जागृत करण्याचे कवीचे सामर्थ्य अनेक पातळींवरच्या अनुभवांतूनही दिसते. प्रेमभाव व्यक्त करताना ते अधिक मनोज्ञ बनते. 'पावले', 'अंतरिक्ष फिरलो' 'साक्षि उद्यांच्या' 'वनफूल' 'सूर्याची पिले' ह्या काही ह्या संदर्भात वाचून पहाण्याजोग्या कविता.

इतर वेळी प्रासादिक व सहज लिहिणारे देशपांडे काही वेळेस रूपकांनी जड झालेल्या ओळी किंवा गद्य व्याकरणात्मक ओळी लिहू शकतात व रसभंग करतात हे खरेही वाटणार नाही परंतु 'पचवून हलाहल', 'जागृतीच्या वृक्षाखाली', 'हे रस्ते सुंदर' ह्या कविता वाचल्यास ह्या लकवी त्यांनी टाळल्या असत्या तर बरे, असे वाटते.

कुठे तरी खटकणारे हे वजा जाता 'वनफूल' वाचताना नेहमी जाणीव होते की तळाशी कुठल्या तरी वेदनेचा कातळ आहे व त्या कातळातून कमीअधिक प्रमाणात आलेले हे पाझर आहेत.

आस्थेवाईक वाचकाच्या मनात जातिवंत कवितेचा अनुभव वेळोवेळी वाचत असताना आपोआपच उमटत असतो. त्या कवितांचा संग्रह वाचून त्या कवीला अजमावण्याची उत्सुकता असते. 'वनफूल' वाचताना ही उत्सुकता समाधान पावते. खोलवर स्पर्शून जाणाऱ्या कवितांची अधिकता हेच ह्या संग्रहाचे यश.

—सुरेश गजेंद्रगडकर

(वनफूल—काव्यसंग्रह—**म. म. देशपांडे** : मौज प्रकाशन, मुंबई—मूल्य रु. ४.५०)

## एक वेगळाच वाङ्मयप्रकार

'आलो ! अखेर मी पालखीबरोबर आलो' ह्या श्रद्धेने लेखक स्वतः एक भाविक वारकरी म्हणून पंढरपूरला जाणाऱ्या ज्ञानेश्वरांच्या पालखीत सामील झाला आहे. पालखीबरोबर प्रवास करताना त्याला भेटलेल्या असंख्य व्यक्तींचं, प्रसंगांचं, अत्यंत सुरेख असं वर्णन ह्या पुस्तकात लेखकाने केलं आहे. पुस्तकाला लाभलेल्या या स्वरुपामुळ हे पुस्तक म्हणजे प्रवासवर्णन व कादंबरी ह्यांचा सुंदर 'संगम'च आहे. पालखीने ललित वाङ्मयात एक उत्तम भर पडली आहे हे निश्चित.

अनुक्रमणिका





पालखीत लेखकाला भेटलेल्या अनेक व्यक्तींचं अत्यंत मार्मिक, वास्तववादी, जिवंत चित्रण करण्यात श्री. मोकाशी यशस्वी झाले आहेत. सत्याशी कलात्मक वा कोठल्याही प्रकारची प्रतारणा लेखकाने केलेली आढळत नाही. ह्या असंख्य व्यक्तीत, बायको-मुलांच्या वनवासाला वैतागून गुरं वळेनात म्हणून पालखीत सामील झालेला वारकरी आहे. त्याचप्रमाणे कामधंदा सोडून फक्त सृष्टी-सौंदर्यासाठी आलेला तरुणही आहे; प्रत्येकाच्या हातावर प्रेमाने सुंठवडा ठेवणारा भाविक आहे, त्याचप्रमाणे ओढ्यात बुडणाऱ्या बाईबद्दल बेफिकीर वृत्ति दाखविणारेही आहेत; पुराच्या बातम्यांऐवजी 'सिलोन' रेडिओ लावणारा 'पोऱ्या' आहे, त्याचप्रमाणे पदरचे पैसे खर्चं करून 'संन्याशा'ला चहा पाजणारा 'पोऱ्या'ही आहे. याशिवाय स्वत: वेगळ्या थाटात राहाणारा 'बुवा' तीस हजारांची मालमत्ता बुवाबाजीवर प्राप्त करून सख्ख्या भावावर नोटीस बजावणारा 'साधु'; 'पालखी'विषयक माहिती विचारताच लेखकाच्या अंगावर धावून येणारा वारकरी अशा एक ना दोन असंख्य व्यक्ती 'पालखी'त साकार झाल्या आहेत.

प्रत्येक प्रसंगामागे, व्यक्तीमागे लेखकाचे स्वत:चे व्यक्तीमत्त्व दडलेले जाणवून येते. लेखकाची बुद्धिमत्ता, त्याची वैचारिक भूमिका, त्याची सहानुभूती ह्यांचे प्रत्यंतर अनेक प्रसंगांतून येते.

ज्ञानेश्वरीत जगाच्या सर्व प्रश्नांचे गूढ उकललेले आढळून येते असं मत कोणी व्यक्त करताच लेखक म्हणतो, "कोणताही एक ग्रंथ जगाचे प्रश्न सोडवील हे पटत नाही. ती अंधश्रद्धा आहे. वारकरी पंथ यामुळेच विचार करण्याचा थांबत आहे. शेवटी एकच वाटतं आहे—हा श्रद्धेचा प्रश्न धरला पाहिजे—श्रद्धा असेल त्यांनी ऐकावं." तो पुढे म्हणतो, "मला वाटतं पालखी श्रद्धेवर चालते तितकीच अडाणीपणावर चालते, यातलं एक चाक निघालं की दुसरं काय होणार? (पृ. १२१) पालखी गेल्यावर नफा, तोटा ह्याच्या हिशोबातून सुटून एखादा मुलगा या मार्गानं जाण्याचा संभव आहे का ? अशी निर्भीड पण कटु शंका लेखकाच्या मनात आल्यावाचून रहात नाही. पण एवढं असूनही आत्मगौरवाचा वा प्रचाराचा वास मात्र कोठेच येत नाही.

ह्या सर्व गुणांहूनही 'पालखी'चे श्रेष्ठत्व कशात असेल तर तिच्या वेगळेपणात आहे. पालखीने ललित वाङ्मय प्रकाशात भर घातली आहे. प्रवासवर्णन, आत्मचरित्र, लघुनिबंध, कादंबरी ह्या सर्वांचे वाङ्मयीन गुण असूनही ह्यातील कोठल्या एकाच प्रकारात 'पालखी'ची गणना होत नाही. त्या दृष्टीने 'पालखी'ची 'अपूर्वाई' श्रेष्ठ आहे. साहित्य पंढरीची एक वेगळी, नवी वाट ह्या श्रद्धावान वारकऱ्याने दाखविली आहे यात संशय नाही. ह्या मार्गाने जाण्याचा प्रयत्न करणारे 'वारकरी' निर्माण होतील अशी आशा बाळगण्यास हरकत नाही.

—नीळकंठ देशपाण्डे

अनुक्रमणिका

## प्रा. कानेटकरांचे नवे नाटक
## 'तुझा तू वाढवी राजा'

प्रा. वसंत कानेटकर हा आजचा एक कल्पक, प्रतिभासंपन्न व समर्थ नाटककार! अगदी पहिल्या नाटकानेच ह्या माणसाने नाट्य-रसिकांचे लक्ष वेधून घेतले व आपल्या नाट्यप्रतिभेची जातकुळी वेगळी व आगळीही असल्याचा प्रत्यय दिला. यशस्वी व चांगले यांचे प्रमाण नेहमी सम असतेच असे नाही. त्याप्रमाणेच कलाकाराची उंची त्याने घेतलेली झेप विचारात घेऊन मोजायची असते. कानेटकर यांच्या रायगड, मत्स्यगंधा, अश्रूंची झाली फुले, वेड्याचं घर उन्हात, लेकुरे उदंड जाली, इथ ओशाळला मृत्यु, प्रेमा तुझा रंग ह्या नाटकांनी कानटकरी प्रतिभेच्या विविध पैलूंचे दर्शन मराठी नाट्य-रसिकाना घडविले आहे. कानेटकरांचा मला भावलेला मोठा गुण म्हणज त्यांची प्रयोगशीलता! आणि त्यांना लाभलेली नाट्यात्म दृष्टि!! त्यांना माणसे भेटत नाहीत. कथा लाभत नाहीत. तर त्यांना दिसते, गवसते नाटक! माणसे मुळी नाट्यात्मकच बोलायला लागतात. त्यामुळेच प्रस्तुत नाटकाची कथा त्यानी जेव्हा प्रथम ऐकविली तेव्हा त्यांच्या-तल्या 'नाट्य' हेरण्याच्या शक्तीचा प्रत्यय येऊन मन भारावले. इतिहास इतिहास म्हणून आम्हीही वाचतो. पण इतिहासातली माणसे जेव्हा पगड्या, अंगरखे टाकून, माणूस म्हणून बोलू लागतात तेव्हा 'कानेटकरांचे नाटक' होते.

हे नाटक शिवाजी राजांच्या बालपणावर आधारित असले तरी ते नाटक आहे जिजाबाईंचे! शिवाजीला तिने उत्तम संस्कार दिले, स्वराज्य निष्ठा दिली, दादोजींकडून उत्तम शिक्षण दिले येवढाच स्थूल इतिहास आपणास ठाऊक आहे. परंतु जिजाईच्या मनातल्या एका सूक्ष्म—व नाजुक अशा संघर्षावर ह्या नाटकाची उभारणी केली आहे. एकीकडे सवतीच्या पायी पतीपासून दूरत्व स्वीकारावे लागले असले तरीही आपल्या मुलाच्या मनातली त्याची प्रतिमा डागाळू नये ह्यासाठी प्रयत्नशील रहायचे होते तर एकीकडे त्याच्या मनात स्वराज्य संस्थापनेचे स्वप्न खोलवर रुजवायचे होते. पति आणि पुत्र ह्या दोन्ही नात्यांची व शक्तींची तिला कल्पना होती. आणि आपाप-सातल्या वैरांनी तिच्या भावना कोळपून गेल्या होत्या तरीही तिला ही दोन नाती जपायची होती आणि स्वराज्याचे स्वप्न साकार झालेले पहायचे होते. तिच्या मनातली सारी धडपड ह्या स्वप्नांभोवती झालेली आहे. तिच्या मनातल्या ह्या द्वंद्वाभोवती ह्या नाटकाची उभारणी झालेली आहे. त्यामुळे कळत (नकळत नव्हे) जिजाबाईच्या व्यक्तित्वाला एक नवे व श्रेष्ठ परिमाण प्राप्त झाले आहे. अर्थातच अशा चरित्र-नाट्यात प्रवेश-निर्मिती ही अपरिहार्य होऊन बसते आणि प्रवेश-निर्मितीलाही काळाचे व माध्यमाचेही बंधन असल्याने त्याला लाभणारे 'डॉक्युमेंटरी'चे स्वरूपही काहीसे अपरिहार्य ठरते. हे नाटक पहात असताना (वा भालजींचे छत्रपती शिवराय पहाताना) हे एक चरित्रकथन आहे ही बैठक सोडता—विसरता येत नाही.




अर्थातच तो नुसता इतिहास नव्हता व हीही नुसती इतिहासाची जंत्री नव्हे. काही घटनांच्या अनुषंगाने येणारे विचार वा भावमंथन ह्याही नाटकात आहे. आणि ते आहे म्हणून तर ह्या नाटकातले नाट्य घडले आहे. शिवाजींची जडणघडण परिचित अशीच आहे. काळाची व्यथा कवि-कलाकारांच्या शब्दातून वा कलाकृतीतून बोलत असते. काळाला आणि जीवनाला भाष्यकार लाभतात म्हनूनच रामायण महाभारत वाचून एखादा शिवाजी संस्कारित होतो. पडदा वर जातो तेव्हा त्या काळाची व्यथा समर्थांच्या वाणीतून स्रवते. आणि महापुरुष ही अखेर असते त्या काळाची अपरिहार्य गरज, मागणी! शिवाजी ही होती त्या काळाची मागणी आणि निर्मितीही! ती नांदी लांबली असे काहींचे मत असले तरी मला तसे वाटते नाही. प्रचंड महा-काव्याच्या नायकाच्या कथेला ती पार्श्वभूमी पुरवते. एका द्रष्टेपणाचा ती साक्षात्कार घडवते. (समर्थांचे मुंडण करण्याचा तूर्तास जाणून बुजून प्रयत्न होत असताना तर हा खराखुरा इतिहास ठासून सांगित-लाच पाहिजे) रोहिड्याच्या रायरेश्वरी शिवाजीने व मावळ्यांनी घेतलेल्या शपथेच्या प्रसंगाने नाटक सुरू होते त्या प्रवेशात शिवाजीच्या मनातल्या स्वराज्यकल्पनेचे (जिजाऊने जपलेले) बीज प्रगट होते. स्वराज्याची बैठक स्पष्ट केली जाते. "कोण्या एका मुर्तिजाला मांडीवर घेऊन थोरल्या महाराजांना जर बादशाही कारभार पाहता येतो तर मनगटाच्या बळावर स्वतःची पातशाही स्थापन करण्याची आस धरण्यात गैर काय आहे!" असे शिवाजी विचारतो. "केव्हातरी, कुठेतरी ह्या लाचारीचे दोर कापलेच पाहिजेत" असे हा मानी राजा म्हणतो. आणि शिवाजीने ही नवी ईर्षा मावळ-मराठ्यात उत्पन्न केली व 'ही तो श्रींची इच्छा' असे अधिष्ठान दिले हे इतिहास सांगतो. जिजाईने केवळ शिवाजीच उभा केला नाही तर एक सईही उभी केली. प्रेम व विचार देऊन मोठी केली. जिजाईच्या तोंडचे एक वाक्य मनात दीर्घकाळ रेंगाळत राहते :

"तुझ्या भाळी फुलपाखराचा संसार लिहिला नाही ग. तुझी गाठ पडली आहे एका गरुडाशी! वेडे, खुराड्यातले दाणे टिपून कधी गरुडभरारीला साथ देता यईल का? वादळावर पाय रोवून उभं रहावं, गडगडणाऱ्या ढगावर घर बांधावं आणि कडाडणारी वीज हाती पकडावी तेव्हाच बये, गरुडाचा संसार होतो."

जिजाईच्या व्यक्तित्वाचा आणखी असाच एक चांगला पैलू 'फ्लॅशबॅक' पद्धतीने रंगमंचावर दाखवून नाटककाराने जणु एक नवा बोध केला आहे. भारतीय इतिहासाच्या एका मर्मस्थानी अचुक बोट ठेवले आहे. भोसले-जाधव वैराचा जेव्हा खेळोजी उल्लेख करतो तेव्हा जिजाऊ म्हणते 'भावोजी, हे काय बोलता आपण? कोण कोणाचे वैरी? कोणाचा सूड कोण कोणावर कां म्हणून उगवणार? भोसल्यांनी वैर करायला जाधवांनी असा कोणता उच्छेद मांडला?



अनुक्रमणिका

देवळं फोडली? मुलाबाळांच्या कत्तली केल्या की लेकी-सुनांची इज्जत घेतली ? भावोजी, ज्या निजामशाहीचे आधार म्हणून भोसले-जाधव बादशहाची चाकरी करतात त्यांच्या राज्यात गरीब रयत केवळ आपण हिंदु आहोत म्हणून 'जकाते हिंदुवानी' हा कर अद्याप भरते आहे. मग इज्जतीच्या आणि पाणउताऱ्याच्या गोष्टी चाकरी करणाऱ्या भोसल्यांनी वा जाधवांनी कशासाठी बोलाव्यात ?"

" – या लढाईतील एक - एकदेखील जखम, मोंगलांनी भरदिवसा पळवून नेलेल्या भोसल्यांच्या एका सासुरवाशिणीची, माझ्या जावेची, भावोजी, तुमच्या बायकोची इज्जत वाचवू शकली नाही."

–जिच्या कुशीतली बाळं यादवीपायी एकमेकांचं रक्त सांडतात त्या माऊलीसाठी मी रडते आहे महाराज, ह्या मऱ्हाठभूमीतली यादवी कधीच का संपणार नाही ?"

पहिल्या अंकाच्या शेवटी दादोजींच्या तोंडची "ब्राम्हण्य म्हणजे न्याय, ब्राम्हण्य म्हणजे निरासक्ति, ब्राम्हण्य म्हणजे निःस्पृहपणा–सत्तेच्या पायघड्यावरून चालायचे पण साधुत्व सोडायचे नाही आणि वैभवात नांदायचे पण वैराग्य विसरायचे नाही. मोठा कठिण भोग ही वाक्ये त्या 'मोठ्या' काळातल्या 'मोठ्या' माणसांचे मोठेपण मनात सजवून जाते.

दुसऱ्या अंकातील शामराज-शिवाजी उपस्थित झालेला सई-शिवाजीचा नर्मशृंगाराचा प्रसंग काहीसा उचित वाटत नाही. शिवाजी अवखळ होता, विनोदबुद्धीचा होता असे गृहित धरले तरी व त्याचे वय लहान होते असे मानले तरीही तेथे कुठेतरी त्याच्या 'स्टेचर'ला ते वागणे साजेसे नसावे असे वाटत रहाते. परंतु नंतरच्या प्रसंगात शिवाजी जे व जसे वागतो, बोलतो ते योग्य वाटते–पटतेही. त्या प्रवेशातले जिजाईचे संवाद कुशल संवादलेखन व तिच्यात दडलेले राजकारण कुशल मन ह्यांचा प्रत्यय देऊन जाते. तिच्या तोंडचे वाक्य 'संत जेणे व्हावे ! जग बोलणे सोसावे । राग रास्त असला तरी वेळ वखत पाहून गिळावा, भयभीतांना मायेच्या शब्दांनी धीर द्यावा, तेव्हाच हजारोंचे हात लागतील आणि हा – हा गोवर्धन कणाकणांनी उचलला जाईल, होयना !"

शहाजी –.जिजाई प्रवेशातही जिजाईची वेदना फार उत्कटतेने व समर्थपणे मांडण्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे. शहाजी राजांच्या मनात हे स्वराज्याचे स्वप्न होते. पण नियतीने त्यांच्या भाळी सतत अपेश लिहिले याबद्दलची व्यथाही श्रोत्याला कळते.

तिसऱ्या अंकात वडिलांच्या सुटकेच्या संदर्भात शिवाजीच्या तोंडून सहजच 'शरणागति' ह्या शब्दांचा उल्लेख होतो. त्यानंतर जिजाईने शिवाजीला केलेले मार्गदर्शन व वडिलांचा उल्लेख येताच त्याच्या आयुष्यातला एक कटु प्रसंग सांगून त्याच्या मनात निर्माण केलेल्या प्रतिमेला दिलेली झिलई तिच्या मनात खोलवर सजलेल्या व चालू असलेल्या संघर्षाची कल्पना देते. ह्या नाटकात वाघनखांचा एक प्रसंग शेवटी आहे. व 'सौभद्र'टाइप, व कुठेही तर्कगत न वाटणारा व उत्कट न झालेला असा एक अगदीच विरस करणारा शेवट लाभला आहे. पतीच्या मनात स्वराज्य कल्पना नव्हती असे ती म्हणत नाही. पण दैवाने पारध केलेला व पंख छाटला गेलेला तो गरुड आहे हाच संस्कार ती मुलावर करते. शहाजींच्याच तोंडी एक वाक्य असे आहे की, तर मग जिजाऊ, तुला एवढे कळायास हवे होते की ऐषआरामात वळवळणाऱ्या क्षुद्र किड्याचा आणि आमचा पिंड वेगळा होता–वेगळा आहे. आम्ही ऐषआराम भोगत नव्हतो–ऐषआरामाच्या डोहात आम्ही आमचे निर्माल्य बुडवीत होतो. (पाठ वळवून डोळे टिपतो) कानेटकरांनी शहाजीराजांच्या मनातली व्यथाही येथे काही प्रवेशातून बोलकी करण्याचा प्रयत्न केला आहे. आपल्या नवऱ्याच्या महत्तमतेची दैवाने शिकार केलेली असताना, त्याची प्रतिमा स्वतःच्या व पुत्राच्या मनात जपत जपत कानेटकरांनी एक समर्थ जिजाऊ उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला आहे. हा प्रयत्न पुरेसा उत्कट झाला नाही अशी खंत मात्र नाटक पहाताना व नंतर जाणवत रहाते. शेवटाबद्दल तर खंत वाटतेच. आणि तरीही जिजाऊच्या मनातल्या खंती अजूनही मनात तरळून जातात. चालू काळाच्या पार्श्वभूमीवर तर हे नाटक अंतर्मुख करून जाते. कानेटकरांचा 'माणसांचा शोध' मला अधिक मोहवितो. आता 'डाक्युमेंटरी'चे स्वरूप असल्या नाटकाला अपरिहार्यतेने येते हे नमूद करतो.

प्रयोगाबाबत लिहिताना राजस साठे (शिवाजी) उषा सरपोतदार (जिजाऊ) दत्ताराम (शहाजी) परशुराम सामंत (नरसीबाबा) बाबूराव सावंत (दादोजी) भारती वर्मा (सई) व मधुकर नाईक (बाजी पासलकर) यांचा खास उलेख करायला हवा. जिजाऊचे बोलणे मात्र काहीसे एकसुरी वाटले. 'ऐतिहासिक' संवादाबाबतही असे म्हणावेसे वाटते की ह्या नाटकात ते फार व फार 'बुकिश' झालेले आहे. काही ठिकाणी ते 'बेअरिंग' सुटते व मग 'संमिश्र' नाटक पाहत असल्यासारखे वाटते. नेपथ्याबाबतही तशी उल्लेखनीय वैशिष्टचे आढळली नाहीत. एक वेगळी जिजाई कानेटकरांनी मराठी रंगभूमीला दिली आहे, असे मात्र जाणवत राहते.

## चक्रावर्त–

महाराष्ट्र राज्य नाटयस्पर्धेसाठी बसविण्यात आलेल्या श्री. वसंत कामत लिखित **'चक्रावर्त'** ह्या नाटकाचा पहिला प्रयोग नुकताच पाहिला. वसंत कामत हे तसे नवे नाटककार नसले तरी स्थिरपद नाटककारही नव्हेत. त्यांच्या ह्या नाटकाचा प्रयोग ठाण्याच्या 'मित्रसहयोग'ने सादर केला व त्याचे दिग्दर्शन श्री. अशोक साठे यानी केले होते. अशोक साठे यांचे 'सांपळा' हे नाटक दोन वर्षांपूर्वी स्पर्धेत फायनलपर्यंत आले होते.. त्याने काही बक्षिसेही संपादन केली होती तेव्हा साहजिकच नाटककार, नाटक व दिग्दर्शकाने सादर केलेला प्रयोग ह्याबद्दल कुतुहल होते.

प्रथमच एक गोष्ट सांगतो. प्रयोग बेमालूम छान बसलेला होता. काही धंदेवाईकांनी धडा घ्यावा अशा देखणेपणाने तो बसविला होता. पात्रे कमी, पण प्रत्येक पात्राला भरपूर वाव असल्याने तो व नाटक मूलतः गंभीर व मनोविश्लेषणात्मक असल्याने त्यात अभिनयाला व

[ पान ५५ वर पहा ]



अनुक्रमणिका








## एक पाऱ्यासारखे व्यक्तित्व :

## पु. ल. देशपांडे

'बहुरूपी' असा शब्द नेहमी वापरला जातो खरा. पण 'बहुरूपी' ह्या वा ह्यासारख्या कुठल्याही एका शब्दात गवसणार नाही असे संपन्न, विविधांगी, बहुगुणी व पाऱ्यासारखेच (शब्दात) पकडायला कठिण पण पकडायचा मोह पाडण्याइतके प्रभावी (व प्रमाथीही) व्यक्तित्व महाराष्ट्राच्या ह्या सुपुत्राला लाभले आहे. क्षणाक्षणाला 'नवतामुपैति" असे प्रतिभेचे वर्णन केले जाते. पु. लं.च्या संदर्भात ही क्षणाक्षणाला नवता प्रतीत व्हावी असे गतिमान - गतिशील आणि त्या गतीनेही अशांत करावे असे व्यक्तित्व त्यांना लाभले आहे. 'तुझे आहे तुजपाशी' ह्या नाटकातला काकाजी म्हणतो 'बोलू दे त्यांना (आचार्यांना) आताच तर कुठे सूर सापडला आहे." पु. लं.च्या बाबतीतही 'सूर सापडला आहे' असं काही जण म्हणतात. ते त्यांच्या आजच्या 'एकपात्री' प्रयोगाच्या व त्यांनी पु. ल. ना दिलेल्या लौकिक व व्यावहारिक यशाच्या संदर्भात ! परंतु जे गतिशील असते, पाऱ्यासारखे चंचल असते आणि जीवनातल्या विविधतेतून एकात्म सौंदर्याचा व निर्मात्याचा वेध घ्यायला लावण्याइतके संपन्न असते. ते प्रतिभासंपन्न व्यक्तित्व 'सूर गवसला आहे' असं मानून स्वस्थ (वा तटस्थ) कधीच होणार नाही. मागे 'दीपावली'साठी मुलाखतीला गेलो असतांना 'काकाजी'च्या संदर्भात बोलताना ते म्हणाले होते की रामूभैया दाते ह्या व्यक्तीवरुन मला काकाजी सुचला वा ते रामूभैयांचे चित्रण आहे असेही लोक मानतात. पण काकाजींचा वाहचवेष, बोलणे-चालणे रामूभैयांचे असले तरी 'त्याचं मन, त्याचे विचार, तत्वज्ञान मात्र माझे आहे. त्या श्रद्धा माझ्या आहेत. 'पु. ल. देशपांडे यांचं अवघं कर्तृत्व पुणे - पार्ले - मुंबईच्या परिसरात घडलेलं तुम्ही आम्ही साऱ्यांनीच पाहचलं. त्या व्यक्तित्वाचे अनेक पैलू पाहिले. त्यांना दाद दिली. दिलखुलास दाद दिली. महाराष्ट्राने ज्यांच्यावर निरलस प्रेम आणि प्रेमच केले अशा संपन्न व्यक्तित्वात 'पु. ल. दे.'चा समावेश होतो. असे प्रेम जनतेने गंधर्वांवर केले. टिळकांवर केले. आचार्य अत्र्यांवर केले—ते करताना उगाचच गुणदोषांची फाजील चिकित्सा केली नाही. 'पु. ल. दे.' यांजवर अशीच प्रीती मराठी माणसाने केली आहे. काही सभा, काही सत्कार समारंभ, काही मैफली मला आठवतात. 'पु. ल.'ना पहायला, ऐकायला लोक उत्सुक असतात. ब्राम्हणसभेत विठ्ठलराव कोरगावकरांच्या पेटी वादनाचा कायक्रम होता. 'पु. ल.' तेथे आले आणि ह्या श्रेष्ठ व ज्येष्ठ कलाकारासमोर मोठ्या आदबीने जाऊन बसले. स्वतः उत्तम पेटीवादक असल्याने त्या वृद्ध (वाटणाऱ्या) बोटांची ती सुरेल करामत त्यांनी कौतुकाने पाहिली. योग्य ठिकाणी दाद दिली. ऐनवेळी त्यांना 'चार शब्द' सांगायची विनंती झाली. लोकांनी टाळ्या पिटल्या. ऐनवेळी ह्या प्रसंगात पकडल्याबद्दल कानपिचक्या देऊनही 'पु. लं.'चा सूर बेसूर झाला नाही. कुमारगंधर्वांच्या 'अनुपरागविलास'चे प्रकाशन, गंधर्वांच्या संबंधात पुणे विद्यापीठात केलेले भाषण, गंधर्व नाट्यमंदिराचा सोहळा ह्या




व अशाच अनेक भाषणांच्या स्मृति ताज्या आहेत—राहतील. 'पु. ल. दे'. यांची वाणी, लेखणी, अभिनय, रसिकता, संगीतप्रेम आणि त्यांच्यातला 'दर्द' जाणणारा 'दर्दी' माणूस सतत मोहवीत आला आहे. माणसांना फक्त 'यश' दिसते. साधना, तपस्या, कष्टांची दिलेली किंमत, केलेली पायपीट, योग्य रस्ता शोधण्यासाठी केलेली भटकंती दिसत नाही. पु. ल. दे. यांचं आजचं यश हे साधना-तपस्येचं यश आहे. आणि त्याचा मला जास्त अभिमान वाटतो. ह्या यशातून त्यांचे 'दातृत्व', त्यांची 'दाद', त्यांची रसिकता, माणुसकी, जीवनातले मंगल व सुंदर जपले—वाढवले पाहिजे ह्या विषयीची श्रद्धा, ढोंगबाजीबद्दलची चीड, विनोदबुद्धि, जीवनातले नाट्य व विसंगति शोधणारी भेदक नजर, त्यांचा मिस्किल आविष्कार करणारी काहीशी तटस्थ वृत्ती, आणि जीवनातल्या, कलेतल्या उत्तमाला दाद देणारी उदंड रसिकता कायम आहे हे मला जास्त महत्त्वाचे वाटते. 'ब्लड बँके'ला वा अलिकडेच अंधांच्या कार्याला त्यांनी ज्या देणग्या जाहीर केल्या आहेत त्या त्यांच्या 'संपन्नते'चा नव्हे तर 'संपन्न' व्यक्तित्वाचा प्रत्यय देतात. उत्तम व्यवहारे धन जोडून आज ते 'उदात्त विचारे' खर्च करीत आहे. कष्टसाध्य यशातून हा माणुसकीचा गहिवर त्यांना लाभला आहे. जीवनावर उदंड प्रेम करणाराच माणूस जीवनावर इतकी सुरेख उधळण करू शकतो. नाट्य, संगीत, चित्रपट, आकाशवाणी, चित्रवाणी, अध्यापन, प्राध्यापकी व कारकुनी, संगीत दिग्दर्शन, 'सबकुछ पु. ल. दे.' प्रवासवर्णन, व्यक्तिरेखाटन, अभिनय, एकपात्री प्रयोग 'वाऱ्यावरची वरात'सारखे बहुपात्री प्रयोग, हंसविणारा धंदा, गडकरी दर्शन, बाबा आमटे व विनोबा भावे, भास्करबुवा बखले आणि गंधर्व, फणसळकर मास्तर आणि बाबा पुरंदरे, रामूभैया दाते आणि ऋग्वेदी नंदा-प्रधान आणि लख्या रिझबुड- किती नावे सांगू ? ('माओचे लष्करी आव्हान'ची अमर प्रस्तावना व ग. दि. मा.ची रसिली दाद-पु. ल. देशपांडे हीं ग. दि. मां.प्रमाणे पन्नास वर्षांचे आले आहेत. परंतु, 'तारुण्य' सतत कायम टेवू शकणारी 'सौंदर्य दृष्टी' पु. लं. ना लाभलेली आहे. त्यामुळे 'अजून यौवनात मी' असं त्यांना म्हणावं लागणार नाही. ते तरुणच रहातील. त्यांना 'चिरतारुण्य' लाभावं व त्यांना अनेक नवे नवे सूर सापडावेत आणि त्या सुरेल व्यक्तिवाच्या सहवासात आम्हाला मात्र भूलोकीच स्वर्गीय आनंद लाभावा अशी इच्छा व्यक्त करतो. देशपांडे आणि देशपांडे युग व युगुलाला मी उदंड 'आयुष्य' चिंतितो.



अनुक्रमणिका



## क्रिकेट आणि अंधविश्वास

### ते यशस्वी नाणं

अंध विश्वास आणि भ्रामक समजुती यातून क्रिकेटचे खेळाडू पण सुटले नाहीत. प्रख्यात खेळाडू लेन हटन आपल्या खिशात ५ शिलिंगचं एक नाणं खेळताना बाळगत असे. बाळपणी (म्हणजे त्याच्या क्रिकेट जीवनाच्या बाळपणी) हटनने ५० धावा केल्या तेव्हा त्याच्या वडिलांच्या एका मित्राने त्याला ते नाणं भेट केलं होतं. हटनची समजूत होती की ते नाणंच त्याला पुढे यश मिळवून देत होतं. हटन "टॉस"सुद्धा त्याच नाण्याने करीत असे.

### सम नि विषम क्रमांक

जॅक हॉब्जला आधी डाव्या पायाला पॅड बांधायची सवय होती. असं केल्याने आपल्या फलंदाजीला शुभशकुन होतो अशी त्याची समजूत होती. बिल एड्रिच सुद्धा खूप दिवस त्याच्या सारखचं पॅड बांधायचा. बर्ट सटक्लिफ् फलंदाजी करायला जाण्यापूर्वी पॅव्हिलियनमधल्या घडाळ्याकडे एकदा नजर अवश्य टाकायचा. तसं केल्याने आपली धाव संख्या वाढेल असं त्याला वाटायचं. क्रिकेटभीष्म "ग्रेस"चा विश्वास होता की बॅटींग ऑर्डरमध्ये त्याचं नाव "सम" संख्येवर असलं तर तो नक्की शून्यावर बाद होणार. पण ज्या संघाकडून ग्रेस खेळायचा त्या संघाचा तो कप्तानच असायचा. व स्वतः पहिल्या क्रमांकावर फलंदाजीसाठी जायचा म्हणून त्याला स्वतःच्या त्या समजुतीचा फारसा त्रास झाला नाही.

### डोक्यावरचा 'ताईत'

इंग्लंडचा सुविख्यात गोलंदाज मॉरिस टेट याने एकदा नवी टोपी विकत घेतली आणि तो ज्या हॉटेलात उतरला होता तिथल्या स्टॅंडवर अडकवून दुसऱ्या दिवशी सामना सुरू होण्याच्या सुमारास पावसाची भुरभुर सुरू होती. टेटने रेनकोट घातला आणि तो स्टॅंडवर स्वतःची टोपी शोधू लागला तर त्याची नवी टोपी तिथून गायब झालेली आणि तिथं एक जुनी पुराणी हॅट अडकवलेली होती. नाईलाजास्तव तो जुनाट टोप डोक्यावर चढवून टेट मैदानावर पोहोचला. त्यादिवशी टेटला ९ बळी मिळाले. त्यानंतर टेटने त्या टोपाला स्वतःजवळ "ताईता"सारखं जपलं.

## 'श्रीमंत' ग. दि. माडगुळकर

'हे तो देवाचे देणे' अशा शब्दातच काही काही मानवी प्रज्ञा-वृद्धि-प्रतिभेच्या देप्तितांचे व चमत्कारांचे वर्णन करावे लागते. काही कवि असतात, कथाकार असतात, कादंबरीकार असतात, नाटककार असतात आणि शिवाय न्यायाधीश असतात, अर्थशास्त्री असतात, उत्तम प्रशासकही असतात—ह्या अनेक गुणांनी नटलेली माणसे जेव्हा पहावयास मिळतात तेव्हा 'हे तो देवाचे देणे' असे वाटून त्या निर्माल्यापुढे मान लवते.

**ग. दि. माडगुळकर** हे नाव आणि त्या व्यक्तित्वात एकरूप झालेल्या असंख्य व्यक्ति आणि अनेक कलांचा जेव्हा मी विचार करतो तेव्हा मला 'हे तो देवाचे देणे' असाच निष्कर्ष काढणे उचित वाटते. ही माणसे लौकिक अर्थांनी यशस्वी वा श्रीमंत असतातच असे नाही पण त्यांच्या ह्या अष्टपैलू व्यक्तित्वाच्या लाभाने मात्र 'श्रीमंत' झालेलीच असतात. त्या श्रीमंतीची मिजास ही लौकिक श्रीमंतीपेक्षा कितीतरी मोठी व वरीचशी चिरंतन अशा स्वरूपाची असते असे मला वाटते. माडगुळकर यांनी मराठी चित्रपट सृष्टी, मराठी कथा, मराठी कविता, मराठी गीत प्रकार, मराठी लावणी व मराठी शायरी, राष्ट्रीय कविता, प्रवासवर्णने, गीतसौभद्र व गीत गोपाळ व गीत-रामायणासारखे 'अमर' प्रयोग आणि असंख्य खंड व दीर्घकाव्ये, बालगीते, शब्दचित्रे व ललित लेख, चित्रपट कथा — संवाद - गीते (व सबकुछ ग. दि. मा.) संगीतिका, काव्यकथा आणि नाटक आणि मासिकाचे संपादन, कथाकथन, नकला, नाट्य-चित्रपटातील भूमिका, वक्तृत्व, आणि देशभक्ती अशा अनेकविध आघाडयांवर आपला पराक्रम गाजवून आज ते पन्नाशी पार करीत आहेत. माडगुळकर यांच्या गप्पा ह्यासुद्धा नुसत्या गप्पा नसतात. तो असतो एक अनुभव ! अनेक पदरी ! त्यात काव्य असते, नाट्य असते, समृद्ध अनुभवाने येणारे संपन्न विचार असतात. रंजक गोष्टीवेल्हाळपणा असतो. उपहास, उपरोध व विनोदाच्या टिकल्याही अधुनमधून उडत असतात. माडगुळकर यांचे कथाकथन रंगते ते त्यातल्या कथेमुळे व नाट्यामुळेही ! माडगुळकरांना कविता 'करावी' लागत नाही— ती होते ! अगदी सहज होते. बसल्या बैठकीत. आता पाहिजे असं सांगून लोक जातात व कविता घेऊन बाहेर पडतात. 'गीतरामायणात'ल्या काही कविता अशा झाल्या आहेत आणि तरीही त्यांचा (वा त्यातल्या कुठल्याच गीताचा) तोल गेलेला दिसत नाही. 'सिद्धहस्त' हा शब्द पुष्कळदा वापरला जातो. पण माडगुळकर यांच्या संदर्भात तो चपखल बसतो. त्यांची प्रज्ञा आणि प्रतिभा सर्वत्र विहरत असते आणि त्यावर 'माडगुळकरी' ठसा उमटवून पुढल्या पराक्रमासाठी निवत असते. गेल्या तीस वर्षांत त्या प्रज्ञेने अनेक चमत्कार घडवले आहेत. 'गीतरामायण' हा मला स्वतःला नेहमीच एक चमत्कार वाटत आला आहे. गीतरामायण 'झाले' आहे—रचलेले नाही. माडगुळकरांनी लिहिलेल्या कथा-पटकथा-गीतांनी त्यांचे नाव मराठी घराघरात पोहोचवले आहे. तर गीतरामायणाने ते प्रत्येकाच्या तोंडी ताजे राखले आहे. माडगुळकर यांचे हे संपन्न व्यक्तित्व त्यांच्या जीवनाच्या अनुषंगाने व प्रामाणिक राहून घडले आहे. 'फॅशन वा टूम' म्हणून माडगुळकरांनी काही स्वीकारले नाही. चिकटवून घेतले नाही. ज्या मातीतून ते घडले त्या मातीचे इमान सोडले नाही. सोडावेसेही वाटले नाही. संताचा वारसा मनात जपला व त्यातून हे महत्तम घडत गेले आहे. संस्कृत, मराठीत

जे 'उत्तम' आहे त्याच्या सहवासाने हे संपन्न व्यक्तित्व साकारले आणि ते ऋण मानण्याइतके ते इमानदार राहिले आहे. अनेक मान-सन्मान घेतले पारितोषिके संपादली. पदव्याही मिळवल्या, खाजगीतल्या व 'पाक्षिक'मधल्या अनेक सभा-बैठकी जिंकल्या. त्यासाठी नाटकी, वेगडी क्लृप्त्या कराव्या लागल्या नाहीत. अंगच्या 'नाना कळांनी' त्यांच्या वेषाला कधी उणेपण आणले नाही. असे हे माडगुळकर आज पन्नाशी पार करीत आहेत. ते म्हणतात—

मी असाच चालणार आहे
मुखी यईल ते गाणार आहे
शब्द सुचेनासाच झाला तर
नुसती शीळ भरीन

माडगुळकरी शीळ ही 'गीत' होऊन येईल अशी माझी खात्री आहे. ते गीत सुरेख असेल आणि सुरेलही !!

माडगुळकरांना उदंड आयुरारोग्य लाभो आणि त्यांच्या प्रज्ञा प्रतिभेचे अनेकविध चमत्कार 'मऱ्हाठी' माणसाला पहायला मिळोत ही इच्छा !!

## अभिनंदन

'दीपावली'चे एक लेखक, गोमंतकाचे एक थोर सुपुत्र, महाराष्ट्राचे एक तरुण, उमेदीचे, कल्पक बुद्धीचे व प्रयोगशील संगीत दिग्दर्शक, हमखास बैठक रंगविणारा एक 'तयारी'चा व 'तब्वेती'चा गायक आणि माझे एक मित्र, सुहृद् श्री. **जितेंद्र अभिषेकी** यांचे ह्याच स्तंभातून अभिनंदन करण्याचा दुसरा सुयोग ! ते गतवर्षी परदेश दौऱ्यावर गेले तेव्हा त्या गायकाला दशदिशा अपुऱ्या पडणार अशी मनोमन खात्री मी करून घेतली होती. "नॅशनल फोरम फॉर द परफॉर्मिंग आर्टस्' ह्या संस्थेने डॉ. होमी भाभा फाऊंडेशनची दरमहा रु. १५०० ची 'फेलोशिप्' जितेंद्र अभिषेकी ह्यांना दिली आहे. संगीतविषयक संशोधनाला देण्यात आलेली ही पहिलीच फेलोशिप आहे आणि तिचा मानकरी होण्याचे भाग्य जितेंद्र अभिषेकींना लाभले हा त्यांच्या कलासाधनेचा गौरवच होय ! कष्ट-हाल-साधनेशिवाय कुठल्याही कलेतले 'सुवर्ण' हाती येत नाही. जितेंद्राची कलारचना ह्या मार्गानेच गेलेली मला ठाऊक आहे. जितेंद्र अभिषेकी यांच्या साऱ्या संगीत साधनेत व व्यक्तित्वातही एक प्रकारचा ताजेपणा आहे. शालीन, शांत वृत्तीचा पण आपल्या प्रयत्न, प्रयोगशीलता व त्यांना आधारभूत असलेल्या कलेचा त्यांचा वेध अचुकपणे ते घेत असतात. 'ते आणि तेच' हा निर्णय घेऊन ह्या साधकाने 'संगीता'ची प्रतिज्ञा घेतली आणि काहीशी 'वाकुडी' व कमी सुखे उपलब्ध करून देणारी वाट चालायला सुरुवात केली. त्या कामातून, कष्टातून व घामातूनच आज अनेक 'भाग्ययोग' फुलून दारी येत आहेत. अशा भाग्य काली मी त्यांचे अभिनंदन करतो. असे अनेकानेक भाग्य योग त्यांच्या सुरांवरून नादावत नादावत त्यांच्या दारी चालत येवोत !!

मित्रवर्य अभिषेकी, आगे बढो !!

**—आदित्य**

[पान ५२ वरून— **रंगमंच...**]

संवादशैलीलाही एक प्रकारचे आव्हान होते. बारीकसारीक हालचाली, उसासे आणि हुंकार, हास्य आणि अश्रु, हर्ष-खेदांच्या अतीत नेणारी उगीचता - पोकळी, संताप आणि वैताग इत्यादि अनेकविध भावभावनांच्या प्रकटनाची मागणी प्रस्तुत नाटक करते. आणि कठ-विण्यास बहुत आनंद होतो की ह्या नाटकातील प्रत्येक पात्र ती ती प्रत्येक मागणी पूर्ण करते. नाटकात ताण खूप आहे आणि तो ताण तसा असह्य होण्यासारखाच आहे. परंतु तो ताण कलाकारांनी समर्थपणे पेलला असल्याने प्रेक्षकांनाही तो साह्य होऊ शकतो. दादा ह्या स्त्रीलंपट व आत्यंतिक स्वार्थी माणसाच्या पापांचा, त्यामुळे झालेल्या आपल्या आईच्या छळाचा व कुचंवणेचा तीव्र आघात त्यांचा मुलगा श्याम ह्याच्यावर पडतो. त्याला कळत नकळत एकाकित्व येते. त्या एकटेपणात तो दादांनीच घरात आणून वाढवलेल्या लालन या मुलीच्या प्रेमात पडतो. तिच्यात तो मुक्ति—दिलासा शोधू लागतो आणि तिचे प्रेम मात्र असते प्रथमपासूनच अवीवर ! आणि मग त्या एकाकीपणाचाच त्याला शॉक बसतो. त्यातून पोकळी येते. आणि असह्य ताण पडल्याने त्याला पंगुत्व येते. आणि मग अवी व लालन कुचंबतात. शेवटी चीड-संताप-मनस्ताप - वाक्ताडन आणि शेवटी संतापाच्या भरात लालनने केलेला श्यामचा खून ! ती मारते सहज—घडतो खून ! श्यामच्या विविध व्यथा-वेदना, त्याचा आनंद आणि पंगुता-अगतिकता बाळ परांजपे यांनी फारच समर्थपणे व्यक्त केल्या. मॉन्तेरोच्या मोटर रेसच्या प्रसंगातलाच (आभासात्मक) त्यांचा अभिनय. पंगुतेचे बेअरिंग त्यानी फारच चांगले राखले. अविनाश (प्रभाकर पाटणकर) या भूमिकेलाही न्याय मिळाला. अधुनमधून "चित्तरंजन कोल्हटकर" जाणवत होते. ते हवेच काय ? लालन (कुंदा गुप्ते) बाबल्या (दिलीप कोल्हटकर) आपल्या भूमिका समर्थपणे सादर करतात. नाटकातली तांत्रिक बाजू, प्रतिकात्मक नेपथ्यरचना, पात्रांच्या वागण्या—बोलण्यातली सहजता, चोख पाठांतर, भूमिका जगण्याइतकी समरसता, गाणे व साऊंड इफेक्टस् वगैरे जमेच्या बाजू होत. नाटकात अजूनही स्पष्टता हवी होती असे मात्र वाटत रहाते. सूचन आहे ते फारच मर्यादित. पाहताना मनातून सहज सुटून जाणारे. एक चांगला प्रयोग. चांगला प्रयत्न, ताण असूनही काहीतरी खोलवर संस्कार करणारा—त्या दृष्टीने लेखक, दिग्दर्शक कलाकार अभिनंदनास पात्र ठरतात.

**—चित्रगुप्त**

[ पान ४६ वरून —**ठोकर** ]

चार गेले. काहीच झाले नव्हते. त्या शीख ड्रायव्हरने आपला राकट नि दणकट पंजा माझ्या खांद्यावर ठेवत म्हटले, "जब साईड नहीं मिलती तो गाडी आग मत लेना बटा ! तुम्हारे गाडीसे रेडिओ की तीन बॉक्से गिर पडी है ! हमन उठाके लायी है। चलो ले जावो !"

मी माझ्या गाडीकडे पाहिले, ताडपत्री फाटली होती नि काही पेटया पडल्या होत्या. त्या शिखांनी रस्त्यांतून गोळा केलेल्या तीन पेटया माझ्या स्वाधीन केल्या. त्यांच्या गाडीचे काहीच नुकसान झाले नव्हते. मी चाचरत मराठीत हिंदी बोललो, "सरदारजी, हम आपका बहोत शुक्रिया है !"

"अच्छा भाय ! गाडी धीरेसे चलाना। जिंदगी बडी किमती चीज है।" ते तीघेजण परत गले. धुळीचे लोट सोडत मर्सिडीज अदृश्य होत होती. त्या गाडीकडे पहात असताना फाळक्यावर लिहिलेली तीन अक्षरे माझ्या डोळ्यासमोर नाचत होती. "सतगुरु तेरी ओट"

* * *



## दिल्लीतले समाजवादी 'सुंदोपसुंद'

राजकारण हा सुंदोपसुंदांचा खेळ आहे असे म्हणतात (पोलिटिक्स इज ए गेम ऑफ स्काऊंड्रल्स) आणि सुंदोपसुंदींचा सत्ता हा धर्म असतो. राजकारण केले, खेळले आणि लढलेही जाते ते सत्तेसाठी व सत्तेचा निर्भय भावनेने त्याग करणारा माणूस सर्वोदयवादी होईल, पण राजकारणी होणार नाही. त्याला कुणी तसे संबोधणार नाही. राजकारण्यांच्या सत्तामोहाला सत्तामोह, सत्ता अभिलाषा, स्वार्थ इत्यादि न म्हणता त्या राजकारणाला तात्विक अधिष्ठान देण्याचा प्रयत्न नेहमीच होत आलेला आहे. हिटलरने जर्मनीत फॅसिस्ट राजवट रुजवली तेव्हाही महान जर्मन राष्ट्राचा कायापालट करण्याची 'तात्विक' प्रतिज्ञाच केली होती. त्यात त्याला यशही आलेले आपण पाहिले. आपल्या देशाला १९४७ साली स्वातंत्र्य मिळाले आणि ह्या देशाचा प्रतिनिधीरूप असलेला काँग्रेस हा पक्ष अधिकारारूढ झाला. देशाच्या स्वातंत्र्यलढ्यात आघाडीवर असलेली माणसे शासनाच्या प्रमुखपदी जाऊन बसले. पंडित नेहरू हे जनतेचे अनभिषिक्त राजे झाले आणि समाजवादी भारताचे स्वप्न मांडले गेले. अनिर्बंध सत्ता आणि असामान्य लोकप्रियता पंडितजींच्या पाठीशी उभी होती. काँग्रेसला प्रखर विरोध करणारा पक्ष नव्हता. स्वातंत्र्य लढ्यातली पुण्याई पक्षाच्या पाठीशी उभी होती आणि भारताचे राजकीय व शासकीय नेतृत्व करण्याचे फार मोठे दायित्व काँग्रेस पक्षावर काल-दत्त कर्तव्य म्हणून आले होते. स्वातंत्र्यपूर्व कालातील काही 'स्लोगन्स' नंतरही 'पॉप्युलर' करण्याचा व राखण्याचा प्रयत्न झाला. जगात भारताची प्रतिमा उज्ज्वल करण्याच्या भूमिकेतून तटस्थतेचे धोरण स्वीकारण्यात आले. निधर्मित्व हा कणा बनला. समाजवाद हा रामनामासारखा मंत्र बनला. राज्य चालूच राहिले. निवडणुकीत सत्ता मिळतच राहिली. काही राज्ये काही प्रमाणात हलली. पण काँग्रेसचा हत्ती एकूण हलला नाही. कुठलीही नवी आव्हाने स्वीकारण्याची वा ती साकार करण्याची ताकद जणु तिच्यात उरली नाही. तरी ही पुण्याई व शासनात असल्याने सहजरीत्या मिळणारे काही फायदे, काही मोठी व ज्येष्ठ माणसे त्यांच्या भरवशावर काँग्रेस उभी राहिली. विरोधकांनी धडका मारल्या. पण पक्ष अबाधित राहिला. १९६७ च्या निवडणुकीत विरोधी पक्षांना 'सत्ते' ची संधी मिळाली. पण 'सं. वि. द.' असली नावे धारण केल्यानंतरही विधायक असे काही घडलेच नाही. आणि ह्या देशाला सुसूत्र व सुस्थिर असे शासन देण्याची क्षमता असलेला एकमेव पक्ष म्हणून काँग्रेसचेच नाव घ्यावे लागले. ज्यांना पंडितजी - शास्त्रीजींच्या कारकीर्दीत काँग्रेस विघटन हवे होते, पण साधले नाही अशा अनेक असंतुष्टांचे प्रयत्न चालूच राहिले. आणि अलिकडच्या काळात 'कोसिजिन' मैत्री फारच वाढल्याचे जाणवू लागले होते. नक्षलवादी, बंगालमधील राजकीय शिरकाण, केरळात व आंध्रात होणारे उद्रेक, ठिकठिकाणचे जातीय दंगे, त्या दंग्यांमुळे ढळणारी धोरणविषयक श्रद्धा आदि अनेक गोष्टींचा उपयोग करून काँग्रेसची एकमेव शक्ति ही येनकेन प्रकारेण खच्ची करण्याचा डाव रचला गेला आणि त्याचे फलित म्हणूनच तूर्त दिल्ली येथे राजकीय रणरंगण चालू आहे. राजकारणात (व लढाईतही) 'आक्रमण' हा संरक्षणाचा उत्कृष्ट मार्ग मानला जातो. ह्या रणरंगणात इंदिरा गांधी यांनी टाकलेले अनेक पवित्रे हे त्यांच्या राजकारणी कुशलतेचे धडाडीचे निदर्शक होते असे म्हणता येईल. राजकारणात 'सत्ता' हा परमधर्म असल्याने व त्यासाठी 'सेवा' ही सर्वोत्कृष्ट 'स्लोगन' असल्याने प्रत्येक भांडणाला तात्विक अधिष्ठान देण्याचा 'धर्म्य' प्रयत्न नेहमीच केला जातो. प्रस्तुत संघर्षात दोन्ही बाजूंनी 'तत्त्वज्ञाना'ची खूपच चेंडूफेक केली जात आहे. आणि समाजवादी व प्रतिक्रियावादी वा प्रतिगामी वगैरे आरोपाची खिरापत तूर्त सर्रास वाटली जात आहे. वास्तविक पाहता, मख्यतः सत्तेच्या डावपेचात मोरारजींचे प्यादे मारण्यासाठी उचलले गेलेले व घाईघाईने तपशीलाविना पसार करून घेण्यात आलेल्या १४ बँकांच्या राष्ट्रीयीकरणाच्या पावलाखेरीज इंदिराजींच्या कारकीर्दीत महान समाजवादी असे फारसे बोलले वा केले गेले नाही. बँक राष्ट्रीयीकरणाची सूचना पूर्वी अनेकदा मांडली गेली होती. परंतु पंडितजींनी व इंदिराजींनी ती फेटाळल्याचे सत्य आता बाहेर आले आहे. तेव्हा समाजवादासाठी आवश्यक असलेली सर्वंकष सत्ता, महान लोकप्रियता, जनतेने दिलेले कौल आणि राजकीय व आंतरराष्ट्रीय मोठेपण ह्या साधनांतून व संघटनेवर लाभलेल्या हुकुमतीतून—(उत्स्फूर्त) पंडित नेहरूंना समाजवादाचा स्वर्ग वा नंदनवन आणता आले नाही. रशियन पॅटर्नच्या तीन पंचवार्षिक योजनाही झाल्या आणि ह्या योजनेतून श्रीमंत अधिक श्रीमंत झाले आणि गरीब अधिक गरीब झाले अशी मनमोकळी व प्रामाणिक कबुलीही पंडितजींनी दिली. गेल्या बावीस वर्षातले राजकारण पाहिले तर असे खासच म्हणता येईल की आम्ही भूमी गमावली, मित्र गमावले, आंतरराष्ट्रीय क्षेत्रातली प्रतिष्ठा गमावली. अंतर्गत वाद व भांडणे यात भर घातली. जातीय, प्रांतीय भाषिक भावनांना खतपाणी घातले जाईल अशीच धोरणे चाल-



वली. 'जगातील जास्तीत जास्त कर लादलेला देश' हे वर्णन स्वीकारूनही येथील आर्थिक धोरणात तोल राखता आला नाही. प्रत्येक सभेत व अधिवेशनात 'समाजवादा'ची टकळी चालू होती. पण सौख्याचे सूत आलेच नाही. ह्याविषयी अंतर्मुख होऊन काही विचार करण्याऐवजी एकमेकांना 'स्केपगोट' करून आज आरोप-प्रत्यारोपांचा धुरळा उडविण्यात काँग्रेसमधली दोन्ही गट मश्गुल आहेत. ह्या आरोप-प्रत्यारोपातून आपण निष्कलंक आहोत आपण समाजवादाचा मंगल कलश आणण्यासाठी खरेखुरे धडपडत होतो. पण 'मेले तेच आडवे येत होते हो' असा आभास उत्पन्न करण्याचा यत्न होतो आहे. तो फसवा आहे. बँक राष्ट्रीयीकरणाला वाईंचाच विरोध होता, संस्थानिकांच्या तनख्यावावत वाईंचाच खरा अडसर होता, जगजीवनरामसारख्यांना वाईंनीच पाठीशी घातले, 'आसाम' फेम फक्रुद्दिन अली व 'मायनस' समाजवादी दिनेशसिंग याना तर वाईंनीच आजची प्रतिष्ठा वहाल केली आहे. आणि काँग्रेसच्या आजच्या सत्ता संघर्षात आज त्यांनी वाजी मारली असली तरी पंडितजींपासून आजपर्यंत त्यांचा ज्या काँग्रेसशी व शासनाशी संबंध होता त्यांच्या द्वारे समाजवादी सूर्य भारतीय क्षितिजावर कां उगवला नाही ह्याचे उत्तर–प्रामाणिक उत्तर त्यांनी देणे अगत्याचे आहे. सर्वंकष सत्ता व असामान्य लोकप्रियता लाभलेली असताना व समाजवादावर प्रखर निष्ठा असतानाही पंडितजींना ते कां शक्य झाले नाही याची काही मोकळी चिकित्सा व्हावी. घोषणांनी रान उठवता येऊ शकते. पण संघटना बांधता यत नाही. समाजवादही आणता येत नाही. गेल्या बावीस वर्षात ह्या देशात ऐक्याचे व समाजवादाचे ढोल डिंडिम सतत पिटले गेले. पण ऐक्याची सतत हानी होईल अशीच धोरणे आखली गेली आहेत हे कटु सत्य आहे. प्रत्येक प्रांतात व जिल्ह्यात दोन काँग्रेस पक्ष अस्तित्वात आहेत. ऐक्य परिषदा होतात. पण 'सिव्हिल कोड' काही होत नाही. 'मतपेटी'वर लक्ष ठेवून 'मुस्लिम अनुनय' चालूच ठेवला जातो. आणि आता सत्तेसाठीच संस्थानी तनखे वगैरेंवावतही काही वेगळी धोरणे आखली जाण्याची शक्यता वोलली जात आहे. आज विरोधी पक्षातील स्वतंत्र-जनसंघीय प्यादी आपल्या पार्टीत आली की त्यांना 'समाजवादी' शेंदूर फासला जाऊ शकतो. कम्युनिस्ट 'सखे' ठरतात आणि समाजवादी कामराज, रामसुभगसिंग, मेहता, कृपलानी, तारकेश्वरी ही मंडळी प्रतिगामी ठरतात. प्रांतोप्रांती पूर्वापार चालत असलेल्या मतभेदांना 'तात्विक' संरक्षण मिळते आणि जनतेला मात्र ऐक्याचे महान संदेश दिले जातात. वास्तविक पाहता लोक नेत्यांनाच– मग ते कुणीही वा कोणत्याही पक्षाचे असोत–आता ऐक्य राखायला शिका, शिस्त पाळायला शिका, संयम पाळायला शिका, आणि पक्ष वा सत्तेपेक्षा पंचावन्न कोटी जनतेने टाकलेल्या विश्वासाला पात्र असे संपन्न व्यक्तित्व निर्माण करायच्या प्रयत्नाला जागा असे सांगण्याची वेळ आली आहे. इंदिराजींच्या 'समाजवादी' घोषणेत नवीन काही नाही. गेली २२ वर्षे आपण तेच वोलत आहोत. पण उक्ति आणि कृतीतले अंतर संपते तेव्हा क्रांत्या होतात. वोलण्यातल्या समाजवादाने मात्र श्रीमंत अधिक श्रीमंत होतात, गरीब अधिक गरीब. आजचा त्यांचा विजय हा त्या श्रद्धेचा विजय आहे. पक्षीय व सत्तावाज राजकारणाला विटलेल्या जनतेने सत्तावाजांना हा इषारा दिला आहे. इंदिराजी जर केवळ सत्तेचेच राजकारण खेळत राहिल्या, तर राज्य टिकेलही. पण समाजवाद येणार नाही. पंडितजींचे ते स्वप्न होते. पंडित कन्या ते स्वप्न साकार करू शकली तर आजच्या काही तांत्रिक प्रमादांबद्दल काळ व जनता त्यांना क्षमा करील. थांबणे व वाट पाहणे येवढेच आपल्या हाती आहे.

## चंद्र आणि मानव –

रामाला हवा असलेला चंद्र गवसला. आधुनिक, विज्ञाननिष्ठ, धाडसी, नवी नवी आव्हाने स्वीकारण्याचा 'तरुण' धर्म आचरणाऱ्या आणि विज्ञानाच्या तुफान सागराला ज्ञानाच्या सेतूने गवसणी घालून चंद्र विजय करणाऱ्या रामाने चंद्र जिंकला आहे. प्रतिबिंबावरले समाधान त्याला तृप्त करू शकले नाही. चंद्रावरची कविता त्याला मोहवीत होती, त्याच्या साहसी प्रतिभेला उत्साहाचे उधाण येतच होते. चंद्रावरला ससा त्याला मोहवीत होता. चंद्रकिरणांची शीतलता त्याला एक नवी झिंग देऊन जात होती. विज्ञानी आणि ज्ञानी, कल्पक आणि साहसी राम अखेर चंद्रावर पोहोचला. जुलै १९६९ हा महिना मानवी प्रज्ञा–प्रतिभेच्या – परिश्रम साहसाच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहिला जाईल. परंतु ज्ञानाला आणि विज्ञानाला 'पूर्णविराम' ठाऊक नसतो, असून चालत नाही. सृष्टि अपार-अनंत-मोहमयी ! तिची सारी रूपे जाणून घेण्याची आव्हाने त्याच्या मनात सहजच स्फुरत असतात. आणि म्हणून क्षणाक्षणाला जगाची नवी रूपे माणसाला ज्ञात आहेत. अमेरिकेचा पहिला चंद्र मानव जुलैत चंद्रभूमीवर उतरला. जगाने त्या दोन वीरांचा जयजयकार केला. भारतानेही केला. मुंबईत जेव्हा नील आर्मस्ट्रांग, एल्ड्रिन व कॉलिन्स आले तेव्हा तेनसिंगच्या एव्हरेस्ट विजयाप्रमाणेच मुंबईकरांनी त्या तिघांना डोक्यावर घेतले. माणसाचे आणि चंद्राचे नाते युगे युगे चालू आहे. त्यामुळेच ह्या चंद्रमानवाचेही स्वागत भाईबंधांच्या प्रेमाने आम्ही केले. ते नाते चिरंतन आहे. चंद्र चिरंतन, ज्ञान–विज्ञान–चिरंतन, मानवी ऊर्मि चिरंतन आणि सृष्टि चिरंतन ! ह्या चिरंतनाचा ध्यास घेऊन पुन्हा तीन माणसे अंतराळात उडाली. वेगळ्या मार्गाने, वेगळ्या सुखरूप ठिकाणी ती चंद्रावर उतरली, सुखरूप उतरली. 'सर्व्हेअर'चे अवशेष त्यांनी



अनुक्रमणिका






शोधून काढले व दोन अडीच वर्षांपूर्वी चंद्रावर सोडलेली ही साधनसामुग्री हस्तगत करून आणि दीड किलोमिटर अंतर चालून (प्रथमच इतका वेळ) हे दोन चंद्रमानव परत आपल्या चंद्रयानात जाऊन बसले असल्याची सुखद वार्ता हा मजकूर लिहिला जात असता ऐकली. श्रुति धन्य जाहल्या. आपोलो ११ व आपोलो १२ ही चंद्रयाने व नील आर्मस्ट्रॉग, एल्ड्रिन, कॉलिन्स वा नव्या मोहिमेतील चार्लस् कॉनरॅड, ॲलन् बीन वा रिचर्ड गॉर्डन हे चंद्रमानव ह्यांनी अमेरिकेचा ध्वज चंद्रावर लावला ते उचितच झाले. परंतु हे दोन्ही विजय हे माझ्या मते मानवी प्रज्ञा-प्रतिभा, प्रयत्न, साहसवाद आणि विज्ञानसंशोधनाची त्याच्या बुद्धीची झेप या साऱ्यांचे आहेत. अमेरिकेने मान वाळगावाच. पण जगाने जयजयकार करावा असाच हा विजय आहे मानव केवळ लहान नाही, स्वार्थी नाही, सत्ताकांक्षी नाही, खुजा नाही, लबाड नाही, अहंकारी नाही, तर तो विश्वाकार होण्याइतका मोठाही आहे ह्याचा प्रत्यय देणारी ही घटना मला फार मोलाची वाटते. चंद्रमानवाचा जयजयकार करताना एक डोळा हसतो आहे आणि एक डोळा––येवढी भव्योदात्त स्वप्ने पाहण्याची आणि त्यासाठी 'मी' त्यावर मात करून विश्वाकार होता येण्याइतकी महत्तमता ह्या देशात फुलावी असे वाटते.

**—सारस्वत**

# क्रिकेटची सव्वाशे वर्षे

### चार फेकींची ओव्हर

इ. स. १७४४ मध्ये इंग्लंडात अस्तित्वात असलेल्या नियमानुसार एका ओव्हरमध्ये ४ चेंडू टाकण्यात येत असत. इ. स. १८८९ त ५ चेंडू टाकण्याचा व इ. स. १९०० त ६ चेंडू टाकण्याचा नियम झाला. इ.स. १९२४-२५-मध्ये इंग्लंडचा संघ ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यावर गेला असता एका ओव्हरमध्ये ८ चेंडू टाकण्याची प्रथा सुरू झाली. आजही ऑस्ट्रेलिया व द. आफ्रिकेच्या संघात सामने होतात तेव्हा ८ चेंडूंची ओव्हर टाकण्यात येते.

सुरुवातीच्या क्रिकेटमध्ये प्रत्येक "धाव" ही धावूनच मिळत असे. इंग्लंडमधल्या ईटन आणि हॅरो या शालेय संघात एकदा सामना चालू असताना एका फलंदाजाने चेंडू इतक्या जोरात फटकावला की चेंडू प्रेक्षकात जाऊन पडला. "आता आपल्याला ४ धावा सहज मिळतील तेव्हा पळायचं कशाला, अंपायर ४ धावा जाहीर करेलच असा विचार करून तो फलंदाज कौतुकाने विकेटपासून थोडा दूर उभा राहिला. दरम्यान चेंडू यष्टीरक्षकाच्या हातात परत येताच त्याने यष्टी उडवली व अंपायरला पण तो खेळाडू बाद झाल्याचा निर्णय द्यावा लागला. या घटनेमुळे झालेल्या विवादातून चौकाराचा जन्म झाला. त्यानंतर खेळाच्या क्रीडांगणाची मर्यादा रेषा आखून किंवा सांखळी वा वांबू लावून निश्चित करण्यात येऊ लागली. चेंडू त्या सीमारेषेच्या बाहेर तडकावल्यावर ४ धावा मिळू लागल्या. षट्कारांचा नियम १९१० मध्ये झाला.

इंग्लंडच्या राजघराण्यातील अनेक जणांना क्रिकेटचा शौक होता. त्यापैकी लॉर्ड फरेडरिक या खेळाडूमुळे 'वाइड-बॉल'चा नियम अस्तित्वात आला. त्याचा किस्सा असा–इ. स. १८१० मध्ये २-२ खेळाडूंच्या संघाचा ५० गिनींच्या बक्षीसाचा एक सामना झाला. एका संघात लॉर्ड फरेडरीक व दुसऱ्यात ओस्वाल्ड स्टोन आणि विल्यम लॅबर्ट होते. सामन्याच्या दिवशी सकाळी ओस्वाल्ड स्टोन थोडा आजारी असल्याने खेळायला नाखूष होता. पण फरेडरिकने सामना थांबवायला नकार दिला. लॅबर्टला नाइलाजास्तव सामना खेळावा लागला. मग त्याने गोलंदाजी करताना फरेडरिकपासून खूप अंतरावर चेंडू टाकायला सुरुवात केली. फरेडरिक रागाने लाल झाला. तोच लॅबर्टने एका चेंडूने त्याची दांडी उडवली. लॅबर्टने स्वतःच्या कंटाळवाण्या "वाइड बॉल" गोलंदाजीने होवार्डलाही लवकर बाद केले. स्वतःची खेळी सुरू झाल्यावर लॅबर्टने एकट्यानेच दुसऱ्या संघाच्या धावसंख्येपेक्षा १५ धावा जास्त केल्या. फरेडरिकने लॅबर्टच्या या लुच्चेपणाची एम्. सी. सी. कडे तक्रार केली. तेव्हापासून 'वाइड बॉल'बद्दल प्रतिपक्षाच्या संघाला एकेक धाव मिळण्याचा नियम करण्यात आला.

**— कमलाकर परांजपे**

[ पृष्ठ ४५ वरून–**मुलाखती** ]

"खेळाडूची वयोमर्यादा पाहू नये असं तुम्ही आत्ताच म्हणालात. हा मुद्दा अधिक स्पष्ट कराल का ?"

"सांगतो. इंग्लंडचा ग्रेव्हनी चाळिशी उलटल्यावरही कसोटी सामने गाजवितो. ब्रॅडमन चाळीसाव्या वर्षी निवृत्त झाले. स्वतः विजय मर्चंट चाळीसाव्या वर्षी अखेरचा कसोटी सामना खेळले. विनू मन्कड, विजय हजारे, अधिकारी हे चाळीशीत किंवा चाळीशी उलटल्यावरही कसोटी सामने खेळले. लाला अमरनाथ यांनी वयाच्या त्रेचाळीसाव्या वर्षी पाकिस्तानबरोबर भारताचे नेतृत्व केले. मग आत्ताच वयाची तिशी उलटण्यापूर्वीच चांगल्या चांगल्या क्रिकेटपटूंची कसोटी सामन्यातून कायमची हकालपट्टी करणे हा त्यांच्यावर अन्याय नाही काय ? पस्तीस वर्षाच्या चंदू वोर्डेचे क्षेत्ररक्षण–फलंदाजी आजही उत्कृष्ट आहे. मग तुम्ही त्याला कोणत्या कारणास्तव गाळणार ? यामुळे होते काय की कोणाही खेळाडूला पुढच्या कसोटीत आपण खेळूच याची शाश्वती नाही. भीतीची टांगती तलवार सतत त्याच्या डोक्यावर लटकत असते. यामुळे त्याच्या खेळावर तर परिणाम होतोच पण उत्कृष्ट दर्जेदार, अनुभवी खेळाडूंना आपण कायमचे मुकत आहोत. भारतीय क्रिकेटला भावी काळात जर मानाचे स्थान मिळवायचे असेल तर निवड समितीचे हे धरसोडीचे आणि लहरी धोरण प्रथम बदलले पाहिजे असे मला कुणाच्याही रागालोभाची पर्वा न करता स्पष्टपणे सांगावेसे वाटते."

●●●






